प्रल्हाद केशव अत्रे

# पाणिग्रहण

तीन अंकी

नाटक

दोन रुपये

या नाटकाचा पहिला प्रयोग शुक्रवार दि. ११ ऑक्टोबर १९४६ रोजीं रात्रौ पुणें येथें भानुविलास नाटकगृहांत 'बालमोहन' नें करून दाखविला.



मुद्रक आणि प्रकाशक :

**कृष्णाजी नारायण सापळे**

रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस,

त्रिभुवन रोड, गिरगांव, मुंबई नं. ४

माझे विद्वान्, रसिक आणि मायाळू मित्र

प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी

यांना

दोन तपांच्या शुद्ध आणि निर्हेतुक मैत्रीची

एक आठवण म्हणून हें नाटक

सप्रेम अर्पण !

# आचार्य अत्रे यांचीं
# दहा नाटकें



१ साष्टांग नमस्कार
२ घराबाहेर
३ भ्रमाचा भोपळा
४ उद्यांचा संसार
५ लग्नाची बेडी
६ वंदे भारतम्
७ पराचा कावळा
८ मी उभा आहें !
९ जग काय म्हणेल ?
१० पाणिग्रहण



# स्वगत

मीं पूर्वी लिहिलेल्या एका चित्रपटाच्या कथानकाचा थोडासा उपयोग मी या नाटकांत केलेला आहे. प्रेम कीं पैसा हा या नाटकाचा विषय आहे. तो इतका साधा आणि मामुली आहे आणि आजपर्यंत तो इतक्या लेखकांनीं हाताळलेला आहे कीं, नाविन्याचा अभिमान वाहणाऱ्या माझ्यासारख्या चोखंदळ लेखकानें तो चिमट्यानें देखील उचलण्याच्या लायकीचा नाहीं असेंच कोणी म्हणेल. मला हें म्हणणें मान्य आहे. मग असें असतां मीं हा शिळ्या कढीला ऊत आणण्याचा कां बरें उपद्व्याप केला? त्याचें उत्तर म्हणजे हें नाटक प्रत्यक्ष वाचूनच पहावें. परिचित विषयही पुन्हां किती सुरस, मनोरंजक आणि नाट्यपूर्ण करून दाखवितां येतो हें दाखवण्याचा हा प्रयत्न आहे. आणि तो यशस्वी झालेला आहे असें निदान मला तरी वाटतें.

'बालमोहन'च्या कुशल नटवर्गानें फारच परिश्रम घेतले म्हणून श्री. दामुअण्णा जोशी ह्यांना हें नाटक अगदीं थोडक्या वेळांत बसवितां आलें. पदांच्या चाली श्री. बबनराव कुळकर्णी यांनीं दिल्या. प्रयोगाची सर्व व्यवस्या श्री. बाबुराव श्रोत्री यांनीं केली. आणि पुस्तक-प्रकाशनाचें काम नेहमींप्रमाणें श्री. बाबूराव सापळे यांनीं पत्करलें. या माझ्या सर्व मित्रांचा मी आभारी आहें.

'राजमाची', खंडाळा,
१० ऑक्टोबर १९४६

प्रल्हाद केशव अत्रे

## पात्रें :

( प्रवेशाच्या अनुक्रमानें )

चंडोल

चंदू

नीरा

चतुर्भुज

घोडके

प्रभात

काका

मावशी

खेरीज कारकून, माळी, पोस्टमन आणि भटजी.

---

# पाणिग्रहण

## १

एका गरीब वसतींतल्या चाळीमधले कवि चंडोल यांचें दोन खोल्यांचें बिऱ्हाड. सकाळची वेळ. तोंडावर पांघरूण घेऊन आणि हातपाय आंखडून चंडोल एका खाटेवर झोंपला आहे. कवीला शोभणारें दारिद्य आणि गबाळेपणा यांच्या आजूबाजूला भरपूर खुणा दिसत आहेत. कोपऱ्यांत एक टेबल आणि एक खुर्ची आहे. टेबलावर कागद आणि पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं आहेत. तासकांटा नसलेलें एक घड्याळ तेथें दिसत आहे. दुसऱ्या कोपऱ्यांत एका स्टुलावर एक स्टोव्ह आहे. शेजारीं दोनतीन भांडीं पडलेलीं आहेत. भिंतीवर महात्मा गांधी आणि रवींद्रनाथ टागोर यांच्या तसबिरी लोंबत आहेत. कांहीं वेळानें शेजारी राहणाऱ्या नीरा नांवाच्या एका बाईची चंदू नांवाची दहा वर्षांची मुलगी ग्यालरीकडच्या खिडकीच्या जाळीमधून डोकावते.

**चंदू** : ( मोठ्यानें ) मामा–मामा–आठ–वाजून गेले ! ऊठ ना ! मला तूं पुस्तक विकत घेऊन देणार आहेस ना आज ? ( चंडोल नुसता या कुशीचा त्या कुशीला वळतो. तशी चंदू दार बाहेरून लोटते आणि आंत धांवत येते. चंडोलच्या अंगावरचें पांघरूण एकदम ओढीत ) मामीटल्या–आळसटल्या, उठतोस का नाहीं आतां ? ( चंडोल झोंपल्याझोंपल्या तिच्या हातांतलें पांघरूण परत ओढून घेतो. ) थांब, तुला गुद्गुल्याच करते. ( त्याच्या अंगाकर चढून बसते आणि त्याला गुद्गुल्या करूं लागते. ) सकाळीं उठोनी देवासीं भजावें । गुरूशीं वंदावें जीवें भावें–जीवें भावें !

[ चंडोल एकदम किंचाळून उठतो. चंदू मोठमोठ्यानें हसूं लागते.

**चंडोल** : ( डोळे चोळीत ) चंदे, कारटे, तूं होय ? मला वाटलं माझ्या अंगावर मांजराचं पिल्लंबिल्लूं चढलं कीं काय ?

**चंदू** : ( मोठ्यानें हसत ) कशी फजिती केली एका माणसाची ?

**चंडोल** : हसतेस नाहीं का ? थांब, तुझं तोंडच बंद करतों.

[ तिला जवळ ओढून तिचा मुका घेऊं लागतो. ती दूर पळते.

**चंदू** : ईऽईऽ ! मला नको जा तुझ्या घाण तोंडाचा मुका ! आधीं तोंड धू अन् दांत घास—

**चंडोल** : ( खाटेवरून उठून खालीं येत ) कार्टे, माझं तोंड घाण आहे काय ?

**चंदू** : आणखी विड्या ओढ विड्या ओढ–म्हणजे तुझ्या तोंडाला अत्तराचा वास येईल चांगला—

**चंडोल** : चंदे, मी कवि आहें हें ठाऊक आहे ना तुला ? विड्या ओढल्यावांचून आम्हां कवि लोकांना मुळीं कविताच करतां येत नाहींत ! शेक्सपीअर विड्या ओढीत होता. कालिदास विड्या ओढीत होता. गडकरी विड्या ओढीत होते. मग मी कां विड्या ओढूं नको ? काल रात्रीं मीं विड्यांचीं दोन बंडलं फस्त केलीं, म्हणून मला ( टेबलावरचा कागद उचलून ) ही एवढी सुंदर कविता लिहितां आली, ठाऊक आहे ?

**चंदू** : बघूं दे मला—

[ त्याच्या हातामधून कागद घेऊं लागते.

**चंडोल** : चल हो दूर, फाडशील माझी कविता ! तुला काय कळणार ती ?

**चंदू** : तर-तर-मोठा आला आहे कवि—

**चंडोल** : (टेबलावर कवितेचा कागद ठेवीत) थांब, मी तोंड धुऊन येतों अन् तुला ही कविता म्हणून दाखवितों.

[ आंत जातो.

**चंदू** : म्हणे मला कविता कळत नाहीं ? मी देखील कविता करीन अशी ! आहे काय त्यांत ?

[ स्वतःशींच एक गाण गुणगुणत इकडून तिकडे नाचतें.

गाड्या गाड्या भिंगोऱ्या,
खेळूं आम्ही ग साऱ्या !

गरा गरा फिरूं आम्ही
गिर्की अशी मारूं आम्ही

आभाळाला घालूं फेऱ्या,
गाड्या गाड्या भिंगोऱ्या !

[ कांहीं वेळानें चंडोल टॉवेलनें तोंड पुशीत आंत येतो.

**चंदू** : (टेबलावरचा कवितेचा कागद उचलून) मामा, मी पिपाणी करूं का या कागदाची ?

**चंडोल** : (तिच्या हातून कागद घेऊन) चल हट्, पिपाणी करतेस होय माझ्या कवितेची ? वा ग वा ! तुझी होईल पिपाणी पण माझ्या कवितेचा वाजेल बाजा ! (कवितेचा कागद टेबलावर ठेवीत) अशी बेफाम कविता लिहिली आहे मीं ही, चंदे, कीं ती उद्यां प्रसिद्ध झाली म्हणजे सारा महाराष्ट्र या चंडोल कवीला डोक्यावर घेऊन नाचत सुटेल अस्सा—

[ चंदूला डोक्यावर उचलून खोलीभर नाचतो. चंदू आनंदानें किंचाळते. तोंच चहाचा कप घेऊन नीरा प्रवेश करते. नीरा ही तीस वर्षांची अत्यंत शांत आणि गंभीर दिसणारी एक स्त्री आहे.

**नीरा** : ( दारांत थबकून ) तुम्ही तिला डोक्यावर घेऊन नाचतां हें असं, म्हणून ती माझ्या डोक्यावर चढून बसली आहे—

**चंडोल** : ( चंदूला खालीं उतरवून तिचे दोन्ही हात धरीत ) इतकी शुंदल मुलगी अशल्यावर तिला दोक्यावल घेऊन कोन नाच्यनाल नाहीं बरं ?

**नीरा** : हा चहा घ्या पाहूं आधीं—

**चंडोल** : ( रागाच्या स्वरांत ) हें अलिकडे चहाचं काय मांडलं आहे तुम्हीं, नीराताई ! मी तुमच्या शेजारीं रहातों ही एक तुम्हाला शिक्षाच झाली आहे म्हणायची ! रोज रोज चहा द्यायला तुमचे पैसे कांहीं वर आले नाहींत ! म्हणजे उद्यांचा दिवस कसा जाईल ही माझ्याइतकीच तुम्हालाही भ्रांति—

**नीरा** : ( दटावून ) आधीं चहा घेतां का नाहीं हा ?

**चंडोल** : ( चहाचा कप घेत ) रोज चहा घ्यायला मी काय तुमचा जांवई आहे ?

[ चहा पितो.

**नीरा** : तुम्हाला जांवई करावयाला माझी कांहीं हरकत नाहीं. काय ग चंदे, तुला पसंत आहे का हा नवरा ?

**चंदू** : ( आनंदून ) कोण हा ? ( एकदम धांवत जाऊन त्याच्या गळयाला मिठी मारून ) ए मामा, होशील का रे तूं माझा नवरा ?

**चंडोल** : ( तिला दूर सारीत ) चल हट्, मामाशीं लग्न करायला निघाली नकटी ! कांहीं लाजलज्जा आहे का नाहीं तुला ? ( वेडावीत ) म्हणे होशील का माज्या नवला ! तुझ्याशीं लग्न लावून मी काय तुरुंगांत जाऊं होय त्या शारदा कायद्याचा भंग करून ?

[ नीरा हसते. चंदू रडवा चेहरा करते.

**नीरा** : बरं बरं ? नाहीं लग्न जमत म्हणून इतकं कांहीं वाईट वाटून घ्यायला नको बरं का ! जा घरांत अन् आंघोळ करून फुलं घेऊन ये माझ्या पूजेचीं—

**चंडोल** : मग आपण तुझं तें पुस्तक आणायला जाऊं बरं का बाजारांत—

**चंदू** : चल, मी नाहीं तुझ्याशीं बोलत जा—

[ रागानें हातपाय आपटीत बाहेर जाते. चंडोल हंसतो.

**चंडोल** : चंदू म्हणजे एक चालती बोलती चिमुकली कविता आहे, नाहीं नीराबाई ? गोड, मधुर आणि मिष्ठास !

**नीरा :** तुमचं काव्य राहूं द्या बाजूला ! तुम्ही लग्न कधीं करणार तें सांगा अगोदर !

**चंडोल :** ( खोट्या रागानें ) तुम्हीं कशाला हो उठाठेव चालविली आहे माझ्या लग्नाची आजकाल ? मी एकटा आनंदामध्यें राहातों आहें इथं म्हणून तुम्हाला हेवा वाटतो होय माझा ? ( एकदम विरमून ) क्षमा करा हं ! मी त्या अर्थानं बोललों नाहीं; मला वाटलं लग्न या संस्थेचा तुम्हाला तिरस्कार वाटत असेल. खरंच सांगा नीराताई, तुमच्यासारख्या देवतातुल्य पत्नीचा आणि चंदूसारख्या तेजस्वी रत्नाचा त्याग करणारा नरपशू ज्या विवाहसंस्थेमधून निर्माण होतो, त्या संस्थेबद्दल माझ्यासारख्या भावनाप्रधान कवीला कसं प्रेम वाटणार !

**नीरा :** सगळ्यांच्याच वांट्याला माझ्यासारखं दुर्दैव येत नाहीं. चंडोल, ( आजू-बाजूला बघून ) काय हा तुमचा संसार ! कसा यांत तुम्हांला आनंद वाटतो ! कुणी आलं इथं तर म्हणेल कीं हें घर आहे का गोठा !

**चंडोल :** नीराताई, आम्हीं कविलोक काय माणसांत जमा असतों अशी तुमची समजूत आहे ? एकदां आमची ब्रह्मानंदीं टाळी लागली म्हणजे मग आम्हांला भूक नाहीं कीं तहान नाहीं, काळ नाहीं कीं स्थळ नाहीं ! ( स्टोव्ह दाखवून ) ही आमची अन्नपूर्णादेवी बघा ! घासलेट नसल्यामुळें गेल्या आठ दिवसांत पेटली नाहीं. म्हणून आम्हांला कांहीं तिची परवा आहे का ?

**नीरा :** शर्थ आहे तुमच्यापुढं ! मग घेऊन कां आलां नाहीं घासलेट ?

**चंडोल :** महाराष्ट्राचा एवढा मोठा मी कवि, नीराताई ! हातांत टिनपाट घेऊन त्या घासलेटच्या रांगेमध्यें तासन् तास उभा राहूं होय रस्त्यावर ?

**नीरा :** ( टेबलावरचें घड्याळ उचलत ) आणि हें तुमचं घड्याळ ! वाहवा, घड्याळ पण घड्याळ आहे !; किती दिवसांत किल्ली दिली नाहींत हो याला ?

**चंडोल :** त्याला किल्ली देऊन उपयोग काय ? त्याचा तास कांटा तुटून एक वर्ष झालं ! बिचारं एकाच पायावर लंगडत होतं पुष्कळ महिने ! त्याचे हाल पहावेनात म्हणून मींच त्याला किल्ली द्यायचं बंद केलं शेवटीं ! काळाची आठवण इथं आहे कुणाला ? नीराताई, तुम्हांला वाटत असेल कीं मी इथं खोलींत रहातों !

**नीरा :** ( आश्चर्यानें ) मग ?

**चंडोल :** मी या खोलींत रहात नाहीं, नीराताई ! मी वर रहातों हा वर ! ( नीरा वर बघते. ) आढ्याकडे काय बघतां ? तिथं नाहीं ! अहो, वर म्हणजे स्वर्गात, एकदम वर ! अप्सरांच्या गळ्यांत हात घालून आम्ही नंदनवानांतून सांजसकाळ

भटकत असतों. चंद्राबरोबर आणि चांदण्यांबरोबर फेर धरून आम्ही ढगांवर नाचत फिरतों, आणि अमृताचं निशापाणी करून आम्ही कल्पवृक्षाखालीं रात्रन् दिवस असे बेहोष पडलेले असतों.

[ खाटेवर हातपाय पसरून पडतो. नीरा त्याचा कान पकडून त्याला उठवते.

**नीरा** : उठा, उठा, स्वर्गांतल्या अप्सरांचं वेड आणि अमृताचं निशापाणी आतां पुरें झालं बरं का–कवि चंडोल! आतां नीट शुद्धीवर या आणि (खाटेवरून त्याला खालीं ओढीत) खालीं पृथ्वीवर उतरा इथं! आणि रक्तामांसाच्या एखाद्या मुलीबरोबर लग्न करून चांगले माणसामध्यें जमा व्हा आमच्यासारख्या !

**चंडोल** : छान, म्हणजे आज एकाच पोटाचा प्रश्न आहे माझ्यापुढं, त्याच्यांत पांचसात पोटांची आणखीन् भर पडायची !

**नीरा** : पांचसात !

**चंडोल** : नाहीं तर काय? आमच्यासारख्या दरिद्री माणसाचं लग्न झालं कीं चार-दोन वर्षांच्या आंत घरांत पोरांची एक पलटण तयार झालीच म्हणून समजा !

**नीरा** : चला, तुमच्याशीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

[ जाऊं लागते.

**चंडोल** : (तिच्यापुढें जाऊन) अहो, जातां कुठं? माझी ही कविता ऐका ना जरा !

**नीरा** : तुम्ही आमचं ऐकत नाहीं, तर आम्हीही तुमचं कांहीं एक ऐकत नाहीं.

**चंडोल** : नाहीं तुम्हीं ही कविता ऐकलीत, तर ती मी फाडून टाकीन आतांच्या आतां, हो ! अन् मग जगांतल्या एका श्रेष्ठ काव्याच्या हत्येला कारण झाल्याबद्दल शेंकडों वर्षें तुम्हाला महाराष्ट्रांतल्या लोकांचे शिव्याशाप खावे लागतील.

**नीरा** : (परतून) बरं बाई, ऐकतें तुमची कविता.

[ ती खुर्चीवर असते. चंडोल खाटेवर बसून कविता म्हणण्याचा सूर लावतो; तोंच चाळीच्या मालकाचा कारकून आंत येतो.

**कारकून** : आहेत का चंडोल ?

**चंडोल** : (एकदम दचकून) कोण आहे ?

**कारकून** : मी भाडं वसूल करणारा कारकून ! (सूर चढवून) गेल्या तीन महिन्यांचं भाडं थकलंय तुमच्या या खोलीचं.

**चंडोल** : (ओरडून) मी कामांत आहें. दिसत नाहीं का तुम्हाला. पुन्हां या.

**कारकून** : शंभर वेळां येऊन गेलों मी इथं. तुमचा पत्ता असेल तर किनई ?

**चंडोल** : (रागानें) पुन्हां या म्हटलं ना ?

**कारकून** : पुन्हां यायला मला वेळ नाहीं !

**चंडोल** : मग येऊं नका ! मरा, जा—

**कारकून** : हा चांगला न्याय आहे !

**चंडोल** : शूः, बोलूं नका मोठ्यानं !

**कारकून** : अहो, पण—

**चंडोल** : खामोश, गप्प बसा म्हटलं ना ! मी इथं यांना कविता म्हणून दाखवतोंय्. कळत कसं नाहीं तुम्हाला ?

[ कारकून बावरल्यासारखा आंत बाहेर घोटाळतो. चंडोल सूर लावतो.

**चंडोल** : (कारकुनाला) तिथं उभे राहूं नका ! एक आंत तरी या नाहीं तर बाहेर तरी जा ! मरणाऱ्या माणसाच्या प्राणासारखे घोटाळत उभे राहूं नका उंबऱ्यांत !

[ कारकून मुकाट्यानें एक बाजूला येऊन बसतो. चंडोल कविता म्हणतो.

डोळ्यांत तुझ्या ही जादु ग,
डोळ्यांत तुझ्या जादू !
वेडा मी झालों पोरि ग ।
मी नाहीं कुणी साधू !
गालावर हे दोन गुलाबी,
प्याले भरले लाल शराबी,
वैराग्याची करिति खराबी,
जात तुझ्या रूपाची न्यारी ।
वेडा मी झालें पोरि ग !

ओठांत हासतातीं,
हे कोहिनूर मोतीं !
वाटे मनीं करावी, यांची हळूच चोरी ।
वेडा मी झालों पोरि ग !

**कारकून** : ( गाणें संपतांच ) भाडं देतांना !

**चंडोल** : ( दांतओंठ खात त्याच्याकडे धांवून जातो ) बेवकूफ, मी शाकाहारी नसतों तर तुला टोम्याटोसारखा कच्चा खाऊन टाकला असता आत्तांच्या आत्तां ! एवढं सुंदर काव्य म्हटलं मीं इथं ! त्याचा कांहीं परिणाम आहे का नाहीं तुझ्या टाळक्यावर ? एकदम मला भाडं मागतोस लेका ! ( अस्तन्या सावरीत ) गुळाची चव नसणाऱ्या गाढवा—रत्नाची पारख नसणाऱ्या कोंबड्या—

**कारकून** : हां—हां—शिव्या देऊं नका—भाडं द्या आधीं !

**चंडोल** : देत नाहीं भाडं ! सांग जाऊन तुझ्या मालकाला !

**कारकून** : देत नाहीं भाडं ?

**चंडोल** : हो, हो, नाहीं देत ! उलट तूंच माझं काव्यगायन आत्तां इथं बसून ऐकलंस त्याचंच भाडं टाक पंचवीस रुपये ! भाडं मागतोय् लेकाचा ! काय रे, महाराष्ट्राचा हा एवढा मोठा कवि तुमच्या या चाळींत राहिला फुकट कांहीं महिने, तर तुमचे बापजादे नरकांत जातील, होय रे ?

**नीरा** : असं काय करतां ? देऊन टाका ना त्याचं भाडं !

**चंडोल** : देऊन टाकायला आहे कुणाजवळ इथं फुटकी कवडी ?

**नीरा** : थांबा. मी मागून आणतें पलीकडून—

**चंडोल** : तुम्ही हलूं नका इथून—

**कारकून** : मग भाडं मिळाल्याखेरीज मीही हलणार नाहीं इथून !

[ दरवाजांत मुक्काम करून बसतो.

**चंडोल** : न हलायला तूं काय हिमालयाचा काका आहेस होय रे ? ऊठ तिथून. नाहीं तर मारतों गचांडी !

[ चंडोल त्याची मानगूट धरून त्याला बाहेर काढतो. तो ओरडतो. नीरा चंडोलला मागें ओढूं लागते, तोंच बाहेरून 'अर्धांगी' मासिकाचे संपादक चतुर्भुज यतात व मारामारी सोडवतात.

**चतुर्भुज** : चंडोल, अरे, काय रे हें ? शब्दाशीं कुस्त्या करायच्या सोडून या माणसाशीं कुस्त्या कशाला रे सुरू केल्यास ?

**चंडोल** : ( हात झाडीत ) भाडं मागतोय् लेकाचा भाडं !

**कारकून** : ( कांगाव्याच्या स्वरांत ) आत्तांच्या आत्तां मी मालकांनाच घेऊन येतों—

**चंडोल** : खुशाल घेऊन ये ! तुझ्या मालकावर एक झणझणीत विडंबन कविता लिहून त्याचा निकालच लावून टाकतों !

**चतुर्भुज** : ( चंडोलला ) ए आतां पुरे कीं. ( कारकुनाला ) किती राहिलंय रे बाबा, तुझं भाडं !

**कारकून** : तीन महिन्यांचे बारा रुपये !

**चतुर्भुज** : ( खिशांतून पैसे काढून त्याला देतो ) हे घे अन् जा कसा बघूं मुकाट्यानें ! ( कारकून पावती देतो आणि चंडोलकडे रागारागानें पहात जाऊं लागतो. चंडोल त्याच्या अंगावर धांवतो. कारकून पळून जातो. ) लेखणी टाकून बंदुका हातीं घ्या असं सावकारांनीं मागं जें सांगितलं आहे त्याचीच तयारी चालविलीस काय ही आजकाल ?

**नीरा** : हल्लीं हे फारच डोकं फिरल्यासारखं करूं लागले आहेत बरं का चतुर्भुज ! मी तुम्हाला विचारत्यें, तुम्ही स्त्रियांच्या मासिकाचे संपादक, यांचे मित्र. तुम्ही मनावर घेऊन यांचं लग्न तरी जमवून टाका एकदां ! त्याखेरीज हें प्रकरण कांहीं ताळ्यावर यायचं नाहीं !

**चतुर्भुज** : नीराताई, हा बोलून चालून कवि. त्यांतून त्याचं नांव चंडोल. चोवीस तास हा आभाळांतून भराऱ्या मारणारा. हा काय माणसाच्या मुलीशीं पाणिग्रहण करील होय ? याला स्वर्गातली एखादी अप्सराच घेऊन आलं पाहिजे !

**नीरा** : पण तुम्ही मुलगी आणा तर एकदां ! मग मुंडावळ्याच्या मुसक्या बांधून हा चंडोल बोहल्यावर उभा करणं काम माझं !

**चंडोल** : किती वेडी आहेस ग तूं, नीराताई ! हा चतुर्भुज माझं लग्न जमविणार ? याच्या नांवावरून तुझा गैरसमज झालेला दिसतोय्. अग, याचं स्वतःचंच लग्न

जमेना म्हणून दोन वर्षांपूर्वी यांनीं 'अर्धांगी' या नांवाचें हें स्त्रियांचें मासिक काढलं! तरी देखील याच्या अर्धांगीचा अजून पत्ता नाहीं. अजून हा गृहस्थ दोन भुजांनींच हिंडतो आहे! हा काय जमविणार माझं लग्न?

**चतुर्भुज** : तूं थांब, या दिवाळी अंकाच्या कामामधून मला जरा मोकळा होऊं दे!

**चंडोल** : म्हणजे, दिवाळी अंक तुझा तयार झाला नाहीं अजून?

**चतुर्भुज** : या कवि चंडोलाची कविता छापल्याखेरीज माझा दिवाळी अंक तयार होईल कसा? म्हणून तर मी आतां आलों होतों तुझ्याकडं!

**चंडोल** : शंभर वर्षं आयुष्य आहे माझ्या कवितेला! कालच रात्रीं लिहून ठेवली आहे ही मीं. (त्याला कवितेचा कागद देतो. चतुर्भुज कवितेचा कागद खिशांत घालूं लागतो) ए संपादक्या, खिशांत काय घालतोस? वाचून बघ, वाचून बघ ती. लेका, शंभर वर्षांत पुन्हां अशी कविता निर्माण व्हायची नाहीं. तूं छाप ही तुझ्या मासिकांत. तुझा तो दिवाळीचा अंक लवंगी फटाकड्यासारखा फडाफड उडून जाईल बघ—

**चतुर्भुज** : (त्याचा हात धरून) काय म्हणतोस! मग मींहि तुझा हा हात कोठल्या तरी पोरीच्या हातांत अडकवून तुझ्या लग्नाचा बार उडवलाच म्हणून समज!

**चंडोल** : अन् मग तुझ्या पाणिग्रहणाचें रे काय होणार?

**चतुर्भुज** : माझं पाणिग्रहण गेलं पाण्यांत! आधीं तुझं, अन् मग माझं जें काय व्हायचं असेल तें—

[त्याच्या पाठीवर थाप मारून जातो. नीरा आणि चंडोल एकमेकाकडे पाहून हसतात. पडदा पडतो.

# [ २ ]

रस्ता. संपादक चतुर्भुज चंडोल कवीची कविता वाचीत वाचीत येतो. क्षणभर थांबतो. 'वा, सुंदर!' असें हंसून स्वतःशींच पुटपुटतो आणि घाईघाईनें निघून जाऊं लागतो. इतक्यांत मागून घोडके प्रवेश करतात. त्यांचें वय सुमारें चाळीस वर्षांचें आहे. गेल्या लढाईत अचानक श्रीमंत झालेला हा एक अशिक्षित आणि असंस्कृत माणूस आहे. हें त्याच्या पोशाखावरून आणि बोलण्याचालण्यावरून तावडतोब लक्षांत येतें.

**घोडके** : संपादक–अहो–संपादक–थांबा कीं जरा—

[ चतुर्भुज मागें वळून पहातो.

**चतुर्भुज** : मला हांक मारलींत आपण ?

**घोडके** : हो–यस, तुम्हाला ! तुम्ही माझ्या अंगावरून गेलांत इकडून अन् बघितलं नाहींत तुम्हीं मला ? मी त्या सोन्याचांदीच्या दुकानांत बसलों होतों. आत्तांच पांचपन्नास हजारांचं सोनं खरेदी करून टाकलं–भाव वाढतोय ना सारखा ? घ्या, हें फूल घ्या–आमच्या बागेंतलं आहे–परवां जी बाग घेतली ना आम्ही तीस हजाराला—

**चतुर्भुज** : फार कामांत आहें मी आत्तां—

**घोडके** : भले, तुम्ही कामांत आहांत अन् आम्ही काय प्रेमांत आहोंत ! टाळी द्या ! आम्ही तुमच्यासारखे लेखक नसलों तरी कोट्या करतों का नाहीं ? ( मोठ्यानें हसतो. ) तुम्ही परवां ऑफिसांत आला होतां ना आमच्या ?

**चतुर्भुज** : तुमच्या ऑफिसांत ? मी ! म्हणजे कुठं म्हणतां ?

**घोडके** : मला ओळखलंत का तुम्हीं ? ( चतुर्भुज नकारार्थी मान हालवतो. ) नाहीं ? भले, कमाल आहे तुमची ? निदान तुम्हाला हा आमचा चेहरा तरी चांगला परिचयाचा असेल ! बघा, नीट बघा ! अहो, आम्हाला न ओळखणारा माणूस साऱ्या हिंदुस्तानांत मिळायचा नाहीं. एक वेळ महात्मा गांधी आणि जवाहरलाल नेहरू यांचे फोटो दिसायचे नाहींत तुम्हाला रोजच्या पत्रांत, पण आमचा फोटो प्रत्येक दिवशीं वर्तमानपत्रांत छापून आला नाहीं असा एक दिवस आढळायचा नाहीं तुम्हाला ! कांहीं विचारूं नका ! अतिशय ‘ पब्लिक ’ गृहस्थ आहोंत आम्ही !

**चतुर्भुज** : पब्लिक !

**घोडके** : हो, पब्लिक ! प्रसिद्ध ! माफ करा हं ! मधूनमधून आपला इंग्रजी शब्द येतो आमच्या तोंडांत !

**चतुर्भुज** : नांव लक्षांत येत नाहीं अजून !

**घोडके** : अहो, असं काय करतांय् ! मसाले, लोणचीं, पापड, मुरंबे बनविणारे सुप्रसिद्ध घोडके यांचं नांव तुम्हीं ऐकलं आहे ना !

**चतुर्भुज** : बरं–बरं—

**घोडके :** अहो तोच मी ! आय इझ धी घोडके !

**चतुर्भुज :** ( आनंदानें त्याचा हात हालवीत ) काय म्हणतां ? वा, आपलं नांव ऐकलं नाहीं असं कसं होईल ? माफ करा हं ! एकदम आपल्याला ओळखलं नाहीं.

**घोडके :** आमच्या सारख्या 'पब्लिक' माणसाचं हें असंच असतं ! नांव माहीत असतं सगळ्यांना ! पण प्रत्यक्ष ओळख अशी कमी—

**चतुर्भुज :** आमच्या दिवाळी अंकासाठीं जाहिरात मागायला आलों होतों मी आपल्याकडे परवां—

**घोडके :** त्या दिवशीं मी कलेक्टरसाहेबांच्या बंगल्यावर गेलों होतों. त्यांनीं मला मुद्दाम बोलावलं होतं ! यंदाच्या पदवीदानांत आम्हाला एखादी पदवी देण्याचा विचार आहे सरकारचा—

**चतुर्भुज :** काय म्हणतां ! ती कशाबद्दल ?

**घोडके :** या गेल्या युद्धांत सरकारला आम्हीं काय मदत केली याची कल्पना आहे तुम्हाला ? लढाईवर गेलेल्या आपल्या साऱ्या हिंदी शिपायांना पापड, मसाले आणि लोणचीं मी पुरवीत होतों. आमच्या पापड–मसाल्यांत काय ताकद आणि पराक्रम भरला आहे हें ठाऊक नाहीं तुम्हाला. आपल्या हिंदी सैन्यानं जर्मन सैन्याचा जो धुव्वा उडवला त्याचं कारण काय याचा कुणी विचार केला आहे का ! महिनेच्या महिने आपल्या शिपायांना दुसरं कांहीं खायलाही मिळत नव्हतं. खिशांत आमचे पापड आणि हातांत बंदूक ! खाताहेत पापड अन् लढताहेत एकसारखे ! असा फडशा पाडला म्हणतां शत्रूचा त्यांनीं !

**चतुर्भुज :** तुमचं चरित्र छापलंच पाहिजे मग आमच्या दिवाळी अंकांत !

**घोडके :** जरूर छापा. आमचं चरित्र म्हणजे नुसती कादंबरी आहे कादंबरी ! वयाच्या तेराव्या वर्षी आम्ही घरांतून जे पळालों आईबापाला न कळवितां, ते थेट एका नाटक कंपनींत गेलों.

**चतुर्भुज :** नाटक कंपनींत ! कोणत्या ?

**घोडके :** अशा तशा नाहीं–गंधर्व नाटक कंपनींत !

**चतुर्भुज :** कमाल केलींत !

**घोडके :** दहा वर्षं काढलीं मीं गंधर्वांत !

**चतुर्भुज :** कोणतं काम करीत होतां तिथं ?

**घोडके** : आचाऱ्याचं ! सुरवातीला वाढपी होतों. मागाहून स्वयंपाक करायला लागलों. तिथं ही पापड–मसाल्याची कला शिकलों. पुढं गंधर्व सिनेमांत गेले आणि मीं कंपनी सोडली. गंधर्व गेल्यावर मनच लागेना कंपनींत !

**चतुर्भुज** : मग पुढं ?

**घोडके** : पुढं, मुंबईला गेलों. तिथं त्या वेळीं काकूबाईची खानावळ म्हणून एक प्रसिद्ध खानावळ होती. तिच्यांत शिरलों आणि काकूबाईचा 'पार्टनर' झालों. तिथं पंचवीस तीस हजार रुपये मिळविले. पुढें काकूबाई मेली. तशी खानावळ बंद करून हा पापड–मसाल्याचा कारखाना सुरू केला. त्याच्यांत आमचं नशीब उघडलं. पांच वर्षांत पाऊणलाख रुपये मिळवले नुसत्या पापडावर, लोणच्यावर अन् मसाल्यावर !

**चतुर्भुज** : भले शाबास !

**घोडके** : पुढं आमच्या नशिबानं ही लढाई सुरू झाली अन् सैन्याला पापड मसाले पुरवावयाचं हें मिलिटरीचं 'कॉंट्रॅक्ट' आम्हाला मिळालं. मग काय विचारतांय् ? पैसा नुसता धो धो वाहूं लागला ! गेल्या सहा वर्षांत दहा लाख रुपये कमावले मेहेरबान, आहांत कुठं ?

**चतुर्भुज** : दहा लाख ! म्हणजे दहावर किती शून्यं ? पांच कां सात ! खरं नाहीं वाटत !

**घोडके** : तुम्हालाच काय पण, मला देखील पुष्कळ वेळां असं वाटतं कीं, मी जागा नसून स्वप्नांत आहें. माझ्या जागीं तुम्ही असतां अन् तुम्हांला इतके पैसे मिळाले असते तर हर्षवायू होऊन तुम्ही मेला असतात !

**चतुर्भुज** : शक्य आहे.

**घोडके** : आमच्या वडिलांची जवळजवळ तशीच स्थिति झाली ना !

**चतुर्भुज** : वडील आहेत अजून आपले ?

**घोडके** : आहेत तर ! आम्ही या मिशा काढतों त्यावरून जाऊं नका. वडील आहेत, आई आहे. दोघेही आहेत. थकले आहेत आतां. आमची आई बिचारी तर इतकी 'बुड्डो' झाली आहे कीं, तिला एक पाऊल टाकवत नाहीं.

**चतुर्भुज** : बुड्डो ?

**घोडके** : म्हणजे म्हातारी हो ! चांगली साठ वर्षांची 'बुड्डो' असेल ती !

**चतुर्भुज** : असं असं. मग आमच्या दिवाळी अंकाला केवढी जाहिरात देतां ?

**घोडके** : काय दरिद्री आहांत हो तुम्ही ! नुसता दिवाळी अंक काय घेऊन बसला आहांत ! तुमच्या साऱ्या मासिकाचा खर्च चालविण्याची ताकद आहे आपल्यांत. पैशाबिशांच्या गरजा नाहींत आपल्यापुढं. लक्ष्मी चोवीस तास हात जोडून समोर उभी आहे अश्शी ! हात वाहतो आहे नुसता ! वाटेल त्यानं यावं आणि हात बुडवून घ्यावेत या वाहत्या गंगेंत ! ( खिशांतलें चेकबुक काढून ) बोला, केवढ्याचा फाडूं चेक ?

**चतुर्भुज** : राहूं द्या हो, तुमचं आमच्यावर एवढं प्रेम असल्यावर चेकची काय किंमत ?

**घोडके** : हें पहा, तसली उधार भाषा आपल्याजवळ नाहीं. आपला सारा व्यवहार अगदीं 'कॅश' असतो. हा पंचवीस रुपयांचा चेक ठेवून घ्या सध्यां बघूं ! ( त्याच्या खिशांत चेक घालतो ) पांच बँकांत खातीं आहेत आपलीं ! सारं जग खरेदी करायची हिंमत आहे आपल्यांत. परवां कायदेमंडळाच्या निवडणुकीला मी उभा राहिलों तर पाण्यासारखा पैसा खर्च केला.

**चतुर्भुज** : तुम्ही उभे होतां परवाच्या निवडणुकींत ? मला माहीत नाहीं ! काय झालें मग ?

**घोडके** : काय व्हायचंय् ? कॉंग्रेसच्या विरुद्ध उभे राहिलों आम्ही. डिपॉझीट जप्त झालं आमचं !

**चतुर्भुज** : मग कॉंग्रेसतर्फेंच का उभे राहिला नाहींत ?

**घोडके** : केला प्रयत्न तो मीं ! कॉंग्रेसला चांगले पन्नास हजार रुपये देऊं केले मीं. पण त्यांनीं तिकीटंच दिलं नाहीं मला. हलकट लेकाचे !

**चतुर्भुज** : निवडून आला असतात तर एखादे वेळीं पापड-मसाला खात्याचे मिनिस्टर झाला असतात मंत्रिमंडळांत !

**घोडके** : तें कांहीं विचारूं नका. आम्ही आयुष्यांत काय वाटेल तें होणं शक्य आहे. तशी आज देखील आपल्याला कोणत्याही गोष्टीची म्हणून कमतरता नाहीं ! पैसा आहे, बंगले आहेत, चाळी आहेत, शेतं आहेत, मोटारी आहेत आणि कीर्तिही आहे जगांत पुष्कळशी !

**चतुर्भुज** : मग अडलं आहे कुठं ?

**घोडके** : जिथं अडायचं तिथंच अडलं आहे. स्पष्टच बोलतों आतां. एवढ्या साऱ्या वैभवाला आणि श्रीमंतीला शोभेलसं माणूस नको का आपल्या आयुष्यांत ?

**चतुर्भुज** : ( भीत भीत ) म्हणजे तुमचं अजून—

**घोडके** : ( मोठ्यानें वाक्य पुरें करीत ) नाहीं ना ! मग काय सांगतोंय्.

**चतुर्भुज** : ( सहानुभूतीनें ) अरे, अरे, अरे ! काय हो हें घोडके ?

**घोडके** : तशा बायका मिळायची पंचाईत नाहीं हो मला ! एक नोट टाकली कीं—

**चतुर्भुज** : असं कां ? मला कल्पना नाहीं.

**घोडके** : मी सांगतों ना–हो ! पण तसलं तें नको आहे ना आपल्याला ! आमची आयुष्यांतली 'अँब्युलन्स' फार निराळी आहे. एवढं आमचं जगांत नांव अन् लौकिक ! दिवसेंदिवस आम्ही जास्त जास्त 'रिपब्लिक' होत जाणार ! उद्यां देशाला स्वराज्य मिळाल्यानंतर विलायतेहून आम्हांला वारंवार बोलावणीं येणार ! अन् तिकडे गेल्यानंतर इंग्रजींतून आम्हाला भाषणं करावीं लागणार ! म्हणून म्हणतों, चांगली शिकलेली बायको आम्हाला असल्यावांचून आमचं कसं चालणार !

**चतुर्भुज** : रास्त आहे.

**घोडके** : शिक्षणाचा आणि आमचा तर लहानपणापासून उभा दावा. शाळा कशी असते हें मीं बाहेरूनसुद्धां पाहिलं नाहीं. चेकवर 'एकनाथ पांडोबा घोडके' एवढी इंग्रजीमध्यें कशी तरी सही ठोकतों झालं ! बाकीच्या नांवानं पूज्य !

**चतुर्भुज** : पण तुमच्या बोलण्यावरून तुम्हाला इंग्रजी येत नाहीं असं कांहीं वाटत नाहीं.

**घोडके** : ( खूष होऊन ) तें आपलं उगीच–लिट्ल लिट्ल !

**चतुर्भुज** : मग तुम्हीं एखादा चांगला मास्तर कां ठेवीत नाहीं !

**घोडके** : काय म्हणावं तुम्हाला आतां संपादक ! अहो, हें वय काय आमचं मास्तर ठेवायचं आहे ! त्यापेक्षां एखादी चांगली शिकलेली बायकोच ठेवली–म्हणजे केली तर काय वाईट ? एका धोंड्यांत दोन पक्षी–

**चतुर्भुज** : आलं ध्यानांत. म्हणजे सुशिक्षित बायको तुम्हाला हवी आहे.

**घोडके** : कसं बोललांत ? एखादी सुंदर, तरुण आणि इंग्रजी शिकलेली मुलगी मिळाली तर तें पाणिग्रहण का काय म्हणतात ना, तें तिच्याशीं करायची आपली इच्छा आहे.

**चतुर्भुज** : ठीक आहे. मग असंच करतों. आमच्या दिवाळी अंकांत तुमच्या पापड-मसाल्याच्या जाहिरातीशेजारीं तुमच्या लग्नाचीही एक झकास मसालेदार जाहिरात देऊन टाकतों !

**घोडके** : भले ! बायका हा काय जाहिराती देऊन मिळवण्याचा माल आहे होय संपादक ? असला दरिद्री सल्ला देऊं नका बुवा आम्हांला !

**चतुर्भुज** : मग काय करूं म्हणतां ?

**घोडके** : अहो, तुमची आमची आतां इतकी ओळख झाल्यावर सुशिक्षित बायको मिळवण्यासाठीं जाहिरात देण्याची मला जरूरच काय ? इतक्या बी. ए. अन् एम्. ए. झालेल्या मुली तुमच्या मासिकाच्या लेखिका आहेत, त्यांच्यापैकीं–

**चतुर्भुज** : भ्रम आहे तुमचा. तुम्हाला म्हणून सांगतों ( हलक्या आवाजांत ) अहो, पुष्कळसे पुरुषच बायकांचीं खोटीं नांवं धारण करून आमच्या मासिकांत ( लेखनाची खूण करीत ) हें करीत असतात ?

**घोडके** : काय म्हणतां ? म्हणजे आम्ही व्यापारी लोक मालाच्या स्तुतीचीं सर्टि-फिकिटं स्वतःच लिहून जशीं बनावट गिऱ्हाईकांच्या नांवांवर छापतों–

**चतुर्भुज** : अगदीं तस्सा आमचा धंदा आहे म्हणानात !

**घोडके** : पण सगळ्याच कांहीं तुमच्या लेखिका बनावट नाहींत, मला ठाऊक आहे ! परवां ज्या मुलीचा फोटो तुमच्या मासिकांत आला होता ती–कुमारी प्रभात देशपांडे, बी. ए.–ही तर तुमची लेखिका खोटी नाहीं ना ? ती तर या गांवांत रहाते. रोज तिला सायकलवरून जातांना आम्ही डोळ्यांनीं पहातों ! तुम्हीही पुष्कळ वेळां तिच्या घरीं जातांना दिसतां–

**चतुर्भुज** : मी तिच्या मावशीकडे जात असतों–

**घोडके** : तुम्ही जा हो तिच्या मावशीकडे खुशाल ! आम्हाला आपले एक दिवस तिच्याकडे हळूच पोहोंचते करून द्या म्हणजे झालं !

**चतुर्भुज** : ती सामान्य मुलगी नाहीं, घोडके !

**घोडके** : एकदम मान्य ! ती सामान्य नसेल ! पण ती मुलगीच आहे ना ? मग झालं तर ! तिची माझी तुम्ही नुसती ओळख करून द्या, मग बाकीचं मी सारं पाहून घेतों. म्हणे ती सामान्य मुलगी नाहीं ! मग आम्ही तरी काय सामान्य पुरुष आहोंत वाटतं ? आमच्याही अंगांत अनेक असामान्य गुण भरलेले आहेत. उगाच

नाहीं दहा लाख रुपये मिळवले. एकदां तिला माझ्या मोटारींत बसून फिरायला येऊं द्या हो—नाहीं एका आठवड्याच्या आंत तिला मिसेस घोडके बनवून बाहेर काढली तर, पापड–मसाल्याचा धंदा सोडून काखेंत न्हाव्याची धोपटी अडकवीन आणि जन्मभर तुमची हजामत करीत बसेन !

**चतुर्भुज** : छान, म्हणजे उलट माझीच हजामत का !

**घोडके** : मग बोला, मला कधीं घेऊन जातां तिच्या घरीं ! ( चतुर्भुज कांहीं बोलत नाहीं ) हें पहा, असे चिंतातुर होऊं नका. या कामीं कितीही पैसे आपल्याला लागले तरी त्याची आपल्याला परवा नाहीं. सह्या करून हें चेकबुकच ठेवून देतों तुमच्याजवळ.

**चतुर्भुज** : ठीक आहे. तुम्ही म्हणतां तर–

**घोडके** : असं तोंडीं नको. वचन द्या ! ( त्याचा हात घेऊन आपल्या हातावर मारून घेतो. ) हें अस्सं ! तुम्हाला मनांतून वाटत असेल कीं हा लेकाचा पापड-मसालेवाला त्या शिकलेल्या पोरीबरोबर काय बोलणार ? पण तसं समजूं नका ! आमच्या बोलण्यांतही मोठा फर्मास मसाला आहे. पहिल्याच भेटींत असं कांहीं झकास ' इंजेक्शन ' मारतों आम्ही तिच्यावर–( चतुर्भुज मोठ्यानें हसतो ) हसतां काय ? तुम्हींच सांगा. तुमच्यावर तर आम्हीं ' इंजेक्शन ' मारलं ना चांगलं ! मारलं ना ? मग काय तर ! चला, तुम्हाला हॉफिसांतच जायचं आहे ना ? मग मी तुम्हाला माझ्या मोटारींतूनच पोचवितों !

[ दोघे जातात. पडदा वर जातो.

## [ ३ ]

गांवाबाहेरील रस्ता. सायकलवरून अर्धवट उतरते आहे अशा स्थितींत प्रभात प्रवेश करते. तिचा चेहरा घाबरलेला आहे. तिचा उजवा पाय जमिनीवर आदळत आहे. चारपांच पावलानंतर ती थांबते आणि मागें वळून पहाते. इतक्यांत कवि चंडोल मागून टांगा टाकीत येतो.

**चंडोल** : अहो बाई थांबा, चाललांत कुठं ? तुमच्या सायकलचा धक्का आमच्या मुलीला लागून ती रस्त्यावर धाडकन् आदळली तरी आपल्या खुशाल सायकल मारीत चाललांत कीं पुढं ! कांहीं वाटतं कीं नाहीं तुम्हाला !

**प्रभात :** ही काय उतरलें तर खरी मी ! चाललें कुठं ?

**चंडोल :** ( सायकलचा दांडा धरून ) चला पोलिस चौकीवर—

**प्रभात :** पोलिस चौकीवर !

**चंडोल :** हो, हो, पोलिस चौकीवर !

**प्रभात :** ( गोंधळून ) अग बाई ग !

**चंडोल :** आतां कशाला करतांय् अगबाई ग ! खुशाल आमच्या मुलीच्या अंगावर सायकल घातलींत, त्या वेळीं नाहीं तुम्हाला आठवली तुमची आई न् बाई ! तें कांहीं नाहीं. तुम्हीं सायकलवाले फार माजला आहांत ! तुम्हाला कोर्टात खेंचून तुमच्यावर धडाधड खटले भरल्यावांचून तुम्ही ताळ्यावर येणार नाहींत–हो ! नाहीं तर उद्यां रस्त्यावरून जाणाऱ्या आमच्यासारख्या माणसाचा बेशक तुम्ही खून पाडाल खून !

**प्रभात :** अहो पण तुमची मुलगी मध्येंच एकदम धांवत आली त्याला मी तरी काय करूं ? विचारा तिला, अग ए मुली—

**चंडोल :** समजा, आमची मुलगी मध्यें आली तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें, तर मग ती तुम्हाला दिसली कशी नाहीं ? तुमचं लक्ष होतं कुठं ? का सायकलवर बसल्या बसल्या चिंतन करीत होता कुठल्या तरी झकास बाबूरावाचं ?

**प्रभात :** ( रागावून ) अहो बुवा, तोंड सांभाळून बोला. भलतं सलत बोलायचं काम नाहीं—

**चंडोल :** अहो बाई, तुम्हीच तोंड सांभाळून बोला. मला बुवाबिवा म्हणायचं काम नाहीं. मी काय बुवा आहें.

**प्रभात :** मग मी काय बाई आहे काय ?

**चंडोल :** हं !

**प्रभात :** हं !

**चंडोल :** बऱ्याच तयार दिसतां कीं तुम्ही !

**प्रभात :** तुम्हीही चांगलेच बनेल दिसतां कीं !

**चंडोल :** ( गुरकावून ) काय हो, नांव काय तुमचं ?

**प्रभात :** तुम्ही खटला भरा माझ्यावर म्हणजे सांगेन—

**चंडोल :** म्हणजे तुम्हाला शंका वाटते कीं काय ? एक सोडून दोन खटले भरीन ?

**प्रभात :** दोन काय म्हणून ?

**चंडोल :** दोन काय म्हणून ? एक या मुलीला लागल्याबद्दल अन् एक मला लागल्याबद्दल !

**प्रभात :** काय कांगावखोर आहांत हो ! तुम्हाला कुठं लागलंय् ?

**चंडोल :** हें काय इथं छातींत ! केवढा जबरदस्त धक्का बसलाय् ! ( विव्हळून ) आई ग !

**प्रभात :** ( मोठ्यानें हसते ) छातींत धक्का बसलाय् काय तुमच्या ? मग घरीं गेल्यावर बायकोकडून नीट चोळून घ्या छाती.

**चंडोल :** बायकोकडून ! तुम्हाला कुणी सांगितलं मला बायको आहे म्हणून ? चेहऱ्यावरून मी काय लग्न झालेला दिसतो काय हो तुम्हाला ?

**प्रभात :** म्हणजे तुमचं लग्न झालं नाहीं ?

**चंडोल :** छट् ! ( चंदूला ) चंदू इकडे ये. दाखव यांना कुठं लागलं आहे तें.

[ चंदू धांवत धांवत येते.

**प्रभात :** मग ही कुणाची मुलगी ?

**चंडोल :** ती आमचीच आहे !

**प्रभात :** इश्श, लग्न झालेलं नाहीं म्हणतां न् मुलगी कशी तुमची ?

**चंडोल :** आमचं राहूं द्या हो ! तुम्हाला कांहीं मूलबाळ ?

**प्रभात :** ( ओरडून ) माझं लग्न झालं नाहीं !

**चंडोल :** नाहीं का ? तरीच—

**प्रभात** . तरीच काय ?—

**चंडोल :** तरीच सायकलवरून जातांना तुमचं लक्ष्य नव्हत—

**प्रभात :** आतां फिरून फाजीलपणा कराल तर—

**चंडोल :** तर काय घरीं जाऊन लग्न कराल ?

**प्रभात :** ( मोठ्यानें ) शट् अप् ! ( हलक्या आवाजांत ) ही सायकल धरा ! चंदू, बघूं दे तुला कुठं लागलंय् तें ?

**चंडोल :** दाखव-दाखव त्यांना किती लागलं तें ! ( चंदू तोंडावर हात ठेवून हसते. ) हंसतेस काय कार्टे, लंगडून दाखव त्यांना नीट-गळा काढून रड मोठमोठ्यानं !

**चंदू :** पण मला लागलंच नाहीं तर—

**प्रभात :** ( चटकन् ) नाहीं लागलं ना तुला ?

**चंदू :** छे, तुमची सायकल चुकविण्यासाठीं मींच एकदम उडी मारली म्हणून खालीं पडलें ! लागलं कुठं मला ?

**प्रभात :** ( चंडोलकडे कठोरपणें बघून ) काय हो, आतां बऱ्या बोलानं तुम्हीच पोलिस चौकीवर येता का मीच पोलिसाला इथं बोलावून आणूं ? फुकट दमदाटी देतां होय भर रस्त्यावर एका अनोळखी स्त्रीला !

**चंडोल :** ( चंदूकडे बघून ) काय बेइमान कार्टी आहे ! खुशाल शत्रूपक्षाच्या बाजूनं साक्ष देऊन टाकली ! म्हणतात ना कीं जातीला जात मिळायचीच ! छे, छे, छे, शेक्सपिअर म्हणतो तेंच खरं ! स्त्रीजात तेवढी हरामखोर ! ( प्रभात आणि चंदू हंसतात. ) काय ग, या बाईची सायकल तुला लागली, असं तूं म्हणाली असतीस तर कांहीं बिघडलं असतं का तुझं ? चांगले या बाईकडून दहापांच रुपये उकळतां आले असते कीं आपल्याला !

**चंदू :** ( चिडून ) पण मी खोटं कसं बोलूं ?

**चंडोल :** तर–तर ( वेडावून ) म्हणे मी खोटं कसं बोलूं ! हरिश्चंद्राची जशी कांही मावशीच तूं कीं नाहीं ? आतां मी नाहीं तुला पुस्तक घेऊन देत तें, चल जा—

**चंदू :** मला नको जा तुझं पुस्तक ! मी आपली यांच्या सायकलवरच बसेन ! बसवाल ना हो तुम्ही मला आपल्या सायकलवर ?

**प्रभात :** अगदीं आनंदानं ! तूं आतां खरं सांगितलंस ना म्हणून मी तुझ्यावर फार खूष झालें आहें. तुला सायकलवर बसवीन आणि पुस्तकही घेऊन देईन एक छानदार गोष्टींचं ! मी देखील आतां पुस्तकांच्याच दुकानाकडे चाललें ! मला तो चंडोल कवींचा नवीन कवितासंग्रह विकत घ्यायचाय ना !

**चंडोल :** ( दचकून ) चंडोल कवींचा !

**प्रभात :** कां हो, दचकलांत कां ?

**चंडोल :** दचकूं नको तर काय करूं ? पुन्हां बोला, पुन्हां बोला. त्या भिकारड्या चंडोल कवीच्या कवितेचं पुस्तक घ्यायला निघालांत तुम्ही ? पैसे फार वर आले कीं काय तुमचे ?

**प्रभात** : हें पहा, ज्या विषयांत आपल्याला कळंत नाहीं किनई त्या विषयावर आपण बोलूं नये. मघाशीं जशी आपली फजिती करून घेतलींत तशी पुन्हां करून घेऊं नका ! काव्य कशाशीं खातात हें तरी तुम्हांला माहीत आहे का ?

**चंडोल** : आहे—चांगलं माहीत आहे. अकलेचं खोबरं ठेंचून त्याची चटणी करतात अन् त्याच्याबरोबर खातात !

**प्रभात** : चंडोल कवीच्या कविता कळायला तुम्हाला दहा जन्म घेतले पाहिजेत !

**चंडोल** : चांगलंच वेड लागलेलं दिसतंय् तुम्हाला या चंडोल कवीचं ! मग मघाशीं सायकलवर बसून येतांना त्याचाच विचार करीत होता कीं काय ?

**प्रभात** : हो हो, त्यांचाच विचार करीत होते. मग काय तुमचा विचार करायचा ?

**चंडोल** : एवढं आमचं कुठून भाग्य असणार !

**प्रभात** : शंभर वर्षांत या महाराष्ट्रांत चंडोल कवीसारखा कवी होणार नाहीं पुन्हां !

**चंडोल** : ( डोक्यावर हात मारून मटकन् खालीं बसतो. ) मग बोलणंच संपलं ! ( थोडें थांबून ) तुम्हीं पाहिलंय् का त्याला ?

**प्रभात** : पाह्यला कशाला पाहिजे ? त्यांचं सारं काव्य मला तोंडपाठ येतंय् !

**चंडोल** : मग तुम्ही डोळ्यानं बघा एकदां त्याचं ध्यान ! त्याखेरीज त्याच्या काव्याचं तुमच्या डोक्यांतलं हें वेड नाहींसं होणार नाहीं ! माझ्या बिऱ्हाडासमोरच रहातो तो एका घाणेरड्या बकाली चाळींत !

**प्रभात** : ( उत्सुकतेनें ) असं ! कसे दिसतात ते ?

**चंडोल** : कसला दिसतोय् तो ? माती अन् दगड ! आहे आपला असाच माझ्या-सारखा फाटक्या अंगाचा. साऱ्या मुलखाचा भ्रमिष्ट आणि माथेफिरू. आठ आठ दिवस आंघोळ करीत नाहीं कीं जेवत नाहीं. चोवीस तास विड्या फुंकतो आणि आभाळाकडे पहात बसतो. अन् रात्रीं बेरात्रीं झोंपेमधून दचकून उठतो आणि गुरासारखा कविता ओरडायला लागतो. चाळींतल्या साऱ्या लोकांना त्यानं अगदीं भंडावून सोडलं आहे !

**प्रभात** : मला घेऊन चलता का त्यांच्याकडे ?

**चंडोल** : वेड लागलंय् तुम्हाला ! तुमच्यासारख्या सभ्य स्त्रीनं भेटण्यासारखा माणूस आहे काय तो ? अहो, पहिल्याच भेटींत एखादे वेळीं तो तुमच्या प्रेमपाशांत पडायचा अन् भलतंच कांहीं तरी व्हायचं !

**प्रभात** : कांहीं भलतंसलतं होत नाहीं. तुम्ही माझी अन् त्यांची ओळख करून द्या !

**चंडोल** : असं म्हणतां ? ठीक आहे. पण तुमची अन् त्यांची ओळख करून द्यायला, तुमची न् माझी ओळख कुठं आहे नीट ? तुमचं तर नांव देखील मला माहीत नाहीं.

**प्रभात** : माझं नांव कुमारी प्रभात देशपांडे. मी बी. ए. आहें. कविता करायचा मलाही थोडा नाद आहे.

**चंडोल** : तें वाटलंच मला तुमच्या चेहऱ्यावरून. काय हो, 'अर्धांगी' मासिकांत ज्या कविता येतात त्या—

**प्रभात** : हो, त्या माझ्याच. तुम्ही वाचतां का ?

**चंडोल** : छे, छे, मी कशाला वाचतोंय् ? आधुनिक कविता म्हटलं कीं मला ओकारीच येते. तें मासिक चाळतों मी कधीं कधीं, म्हणून तुमचं नांव वाचल्याचं आठवतं.

**प्रभात** : तुमचं नांव नाहीं सांगितलंत ?

**चंडोल** : सांगतों. पण माझं ऐकतां का थोडसं ? एवढ्या तुम्ही शिकलेल्या अन् बी. ए. झालेल्या; ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास अशा थोर थोर साधुकवींचीं उत्तम उत्तम काव्यं वाचायचीं सोडून तुम्ही या फडतूस चंडोलाच्या आणि कावळ्याच्या कशाला मागं लागला आहांत हो ?

**प्रभात** : ( रागानें ) साधुसंतांचीं काव्यं वाचायला कांहीं वय झालं नाहीं अजून किंवा माझे केसही पिकले नाहींत वाखासारखे ! तुम्हीच त्यांच्या गाथा न् पोथ्या डोक्यावर घ्या आणि पंढपूरच्या वाळवंटांत जाऊन नाचत बसा !

**चंडोल** : उगाच नका बोलूं ! कुठं ज्ञानेश्वर, तुकाराम आणि कुठं चंडोल ? कुठं हिमालय न् कुठं चतुर्शिंगी ! जुन्या कवीच्या तोडीचं एक काव्य तरी तुमच्या या चंडोल कवीनं कधीं केलं आहे का ? दाखवा पाहूं म्हणून !

**प्रभात** : एक नाहीं दहा काव्यं म्हणून दाखवीन–एकापेक्षां एक सुंदर आणि सरस ! चला आतां घरीं—

**चंडोल** : आपली तयारी आहे. चंदे, तूं घरीं जा–पळ ! ( चंदू जाते. ) तुम्ही चंडोल कवीच्या कविता म्हणून दाखवा; आपण तुम्हाला तुकारामबुवांचे अभंग म्हणून दाखवितों ! अशी तुमची फजीती करतों—

[ दोघेंही जातात. पडदा वर जातो.

## [ ४ ]

सकाळची वेळ. प्रभातच्या बंगल्यामधला दिवाणखाना. काका चोरट्या पावलांनीं मागें पहात पहात एका दारांतून आंत येतात. काका हे प्रभातच्या मावशीचे यजमान. जवळ जवळ साठ वर्षांची त्यांची उमर आहे. आंत येतांच ते पुस्तकांचें कपाट उघडतात; आणि पुस्तकाच्या आंत दडवून ठेवलेल्या सिगारेटच्या पेटीमधून एक सिगारेट आणि काड्याची पेटी बाहेर काढतात. भीतभीत ते सिगारेट पेटवतात आणि घाईघाईनें तिचे झुरके घेतात. तोंच आंतून 'प्रभात, अग प्रभात–' अशी मावशींची हांक येते. त्याबरोबर काका सिगारेट विझवतात आणि पुस्तकाच्या कपाटावर ठेवून देतात. वर्तमानपत्रानें खोलीतील धूर पांगवतात. धोतरानें तोंड पुसून एक जाडसें पुस्तक हातांत घेतात आणि ते वाचित असल्याचा आविर्भाव आणतात. इतक्यांत मावशी प्रवेश करते. मावशीचें वय अडतीस एकूणचाळीस असून तिला दागदागिने आणि भारी कपडे घालण्याचा चांगलाच शोक असावा हें पाहिल्याबरोबर लक्षांत येतें.

**मावशी** : कधींची बाहेर गेली आहे ही प्रभात ! अजून कशी आली नाहीं ती ? ग्वाल्हेरचे जागिरदार तिला पहायला आले होते. ते कंटाळून कंटाळून निघून देखील गेले ! ( एकदम थांबते. तिला कसलातरी वास येतो. ) अगबाई, वास कसला सुटला आहे हा जळाल्याचा ? कांहीं पेटलंबिटलं तर नाहीं ? ( हुंगल्या-सारखें करून ) तंबाखूचा वास दिसतो आहे हा !

**काका** : ( पुस्तकामधून वाचल्यासारखें करून ) "–या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः । "

**मावशी** : ( टेबलावरची काड्याची पेटी उचलून ) अन् ही काड्याची पेटी कशी आली इथं ? ( काकाकडे संशयानें बघते आणि मग सारें तिच्या लक्षांत आल्या-सारखें दिसतें. ) भला सांपडला चोर ! ( काकाकडे रागारागानें येत ) माझा डोळा चुकवून तिकडून आलांत अन् इथं सिगारेट ओढीत बसलांत होय हो ?

**काका** : ( तिच्याकडे लक्ष न देतां आणखी मोठ्यानें ) कर्मण्येवाधिकारस्ते—

**मावशी** : ( त्यांच्या हातून पुस्तक ओढून घेते ) ऐकूं आलं का काय विचारलं मीं तें ?

**काका :** असं काय करतेस ! मीं इथं गीता वाचीत बसलोंय—

**मावशी :** गीता आहे काय ही ? कामशास्त्राचें पुस्तक आहे तें ? ( काका विरमल्या-सारखे होतात. ) एवढं वय झालं आतां तुमचं ! खोटं बोलायची लाज कशी वाटत नाहीं तुम्हांला ! बोला, तुम्हीच ओढत होतां का नाहीं सिगारेट आतां इथं ? ( काका बोलत नाहींत. ) कुठं टाकून दिलींत ती ? तुमच्या या विड्यांनीं अन् काड्यांनीं दिवाणखान्याला आग लागून एके दिवशीं या बंगल्याची जेव्हां राखरांगोळी होईल किनई तेव्हां तुमचं हें थांबेल !

[ सिगारेटचा तुकडा इकडे तिकडे शोधूं लागत.

**काका :** मीं बाहेर टाकून दिली सिगारेट—

**मावशी :** हजार वेळां तुम्हाला मीं ओरडून सांगितलं, कीं तुमच्या या विड्या अन् सिगारेटी ओढणं मला बिलकूल खपायचं नाहीं म्हणून—

**काका :** एक तर झुरका ओढला—

**मावशी :** विड्या ओढायचं हें काय वय आहे तुमचं ? एक दिवस सिगारेट फुंकतां फुंकतां खोकल्याचा ठसका लागून जेव्हां तुमचा प्राण जाईल आणि माझं कपाळ पांढरं झालेलं तुम्हांला दिसेल किनई—

[ एकदम हुंदका देऊन रडूं लागते.

**काका :** पाया पडतों तुझ्या मी. नाहीं ओढणार बरं पुन्हां सिगारेट. पण रडूं नकोस. जिवंत आहें मी अजून—

**मावशी :** ( डोळे पुशीत ) लग्नाच्या वेळीं माझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगितलं होतंत कीं ' जन्मांत मी विडीला न् तंबाखूला शिवणार नाहीं म्हणून '—

**काका :** लग्नाच्या वेळीं माणूस अडचणींत असतो. त्या वेळीं तो काय वाटेल त्या शपथा घेतो—

**मावशी :** ( रागावून ) काय म्हणालांत ? पुन्हां म्हणा पाहूं ! म्हातारपणीं माणूस कोडगं होतं म्हणतात किनई तेंच खरं आहे. ( काका स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटतात. ) चला, आधीं देवघरांत चला–आणि गीतेवर हात ठेवून शपथ घ्या पुन्हां माझ्यासमोर—

[ काकांचा हात धरून त्याला ओढीत नेते. दुसऱ्या बाजूनें प्रभात आणि चंडोल येतात.

**प्रभात** : ( चंडोलला ) बसा.

[ चंडोल आणि प्रभात समोरासमोर बसतात.

**चंडोल** : आधीं तुम्ही म्हणतां का मी म्हणूं ?

**प्रभात**: ( थोडीशी चिडून ) गप बसा पाहूं जरा ! ( स्वतःशींच सूर लावते. थोड्या वेळानें ) चंडोलच्या प्रेमगीतांपैकीं एक उत्कृष्ट प्रेमगीत म्हणून दाखविते तुम्हाला. ऐका नीट—

उगवला चंद्र पुनवेचा !
मम हृदयीं दरिया ! उसळला प्रीतिचा ।
दाहि दिशा कशा खुलल्या,
वनिंवनीं कुमुदिनी फुलल्या,
नववधु या अधिर मनीं जाहल्या !
प्रणयरस हा चहुंकडे । वितळला स्वर्गिचा !

( गाणें संपतांच ) काय हो, असं काव्य रचलंय् का तुमच्या तुकारामानं किंवा त्या रामदासानं ?

**चंडोल** : इतक्यांत नाहीं उत्तर देत मी. आणखी एकच कविता म्हणून दाखवा त्या चंडोलाची ! मग सांगतों तुम्हाला.

**प्रभात** : ठीक आहे.

[ पुन्हां सूर लावूं लागते तोंच संपादक चतुर्भुज आणि घोडके प्रवेश करतात. चंडोलची पाठ चतुर्भुजाकडे असते म्हणून तो त्याला एकदम ओळखत नाहीं.

**प्रभात** : ( उठून ) या, चतुर्भुज ! या—

**चतुर्भुज** : ( मागें असलेल्या घोडक्यांना ) या ना घोडके. या आमच्या कुमारी प्रभातदेवी. महाराष्ट्राच्या उदयोन्मुख कवयित्री आणि आमच्या अर्धांगी मासिकाच्या सुप्रसिद्ध लेखिका. ( घोडके नमस्कार करतात. ) अन् हे महाराष्ट्राचे अत्यंत सुप्रसिद्ध आणि धनाढ्य व्यापारी श्रीमान् घोडके—

**प्रभात** : ( औपचारिक नमस्कार करीत ) अस्सं—

**घोडके** : ( हसत ) येस्, आय इझ धी घोडके !

**प्रभात** : ( हसूं दाबून ) कसला व्यापार करतात हे ?

**घोडके** : ( ऐटीनें ) वेल्, आय मेक पापड, लोणचीज् आणि मसालाज्—

**प्रभात** : बसा. ( चंडोलला ) हे ' अर्धांगी ' मासिकाचे संपादक चतुर्भुज.

**चंडोल** : ( उठून ) नमस्कार संपादक.

**चतुर्भुज** : ( आश्चर्यानें ) अरेच्या, कवी ! अन् तूं रे लेका इथं कुठं ?

**प्रभात** : काय म्हणालांत ? कवी—कोण कवी ?

**चतुर्भुज** : म्हणजे, तुम्ही ओळखत नाहीं यांना ?

**प्रभात** : नाहीं. मघाशीं रस्त्यामधें तर यांची माझी गांठ पडली. सांगा कोण आहेत हे ?

**चतुर्भुज** : अहो, हे महाराष्ट्राचे—

**चंडोल** : ( त्याच्या तोंडावर हात ठेवून ) ए, गप्प बस कीं—

**चतुर्भुज** : ( त्याचा हात बाजूला काढीत ) महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कवी चंडोल म्हणतात ते हेच !

**प्रभात** : ( गोंधळून ) काय म्हणतां ?

**चतुर्भुज** : मीच ओळख करून देणार होतों यांची अन् तुमची—

**प्रभात** : ( चंडोलला ) काय भयंकर आहांत हो तुम्ही !

**चंडोल** : ( हसून हात जोडीत ) चूकभूल द्यावी घ्यावी.

**चतुर्भुज** : फार बदमाष आहे हा ! काय रे, काय केलंस ?

**प्रभात** : छे, छे, छे, ! अशी फजीती जन्मांत झाली नसेल माझी ! ( तोंड झांकून घेत ) काय गाढव आहें मी ! ( तोंड उघडून चंडोलकडे पहाते व पुन्हां लाजते ) इश्श ! तुम्हांला तोंड दाखवायला देखील मला लाज वाटते !

[ दारामधून आंत पळून जाते.

**चंडोल** : अहो, पण–

**चतुर्भुज** : मी घेऊन येतों त्यांना ! ( जातांना त्याच्याकडे पहात ) काय भानगड केली आहे लेकानं कोण जाणें ?

[ जातो. चंडोल स्वतःशीं मोठ्यानें हसतो.

**घोडके** : अस्सं, तर प्रसिद्ध चंडोल कवि ते आपणच.

**चंडोल** : ( एकदम भानावर येतो व गंभीर होतो ) हो, कां ?

**घोडके** : यू मेक पोलट्री काय ? फार आनंद झाला आपल्याला बघून ! मग तुम्हांला देखील आमचं नांव माहिती असलंच पाहिजे !

**चंडोल** : ( थट्टेनें ) म्हणजे काय ? पापड–मसालेवाले घोडके हें नांव माहीत नाहीं असा मायेचा पूत कोण आहे या महाराष्ट्रांत ?

**घोडके** : ( हसून ) अस्सं ?

**चंडोल** : जेवायच्या वेळीं प्रत्येक ठसक्याबरोबर लोकांना तुमची आठवण होते !

**घोडके** : ( खूष होऊन ) वा–वा !

**चंडोल** : अन् बायका तर धोंडोपंत कर्वे आणि गोपाळराव देवधर यांच्या आधीं तुमचं नांव घेतात.

**घोडके** : तें कांहीं विचारूं नका ! बायकांमध्य आम्ही भयंकर रिपब्लिक आहोंत !

**चंडोल** : तुम्हांला खरं सांगूं ? अहो, तुमचे पापड अन् मसाले खाऊन तर मला कविता लिहायची प्रथम स्फूर्ति आली ?

**घोडके** : काय म्हणतां ? शेक हॅण्ड ! शेक हॅण्ड ! मग तुमच्यावर आम्ही बेहद्द खूप झालोंत ! ( मोठ्यानें ) बस् , जगांत चंडोल कवीसारखा कवी नाहीं–तुमची एकहि कविता न वाचतां छातीवर हात मारून सांगतों आम्ही आतां ! ( चंडोलचा चेहरा पडतो ) कविराज, आपल्या डोक्यांत एक कल्पना आली आहे. विचारूं का ?

**चंडोल** : काय ?

**घोडके** : आमच्या कारखान्याच्या पब्लिशिटी खात्यांत आम्हाला एका कवीची जरूरी आहे—

**चंडोल** ! छे, छे, भलतंच—!

**घोडके** : अहो, खरंच सांगतों. दर महिन्याला जाहिरातीसाठीं आमच्या पापड-लोणच्यावर आणि मसाल्यावर आम्हाला नवीन नवीन कविता करून लागतात–महिना शंभर रुपये पगार देईन कीं तुम्हाला ! आमचा माल चांगला इंग्लंड अमेरिकेपर्यंत जातो. साऱ्या जगांत नांव पसरेल तुमचं ! भयंकर रिपब्लिक व्हाल तुम्ही, आहांत कुठं ?

[ चंडोल मोठ्यानें हसतो.

**घोडके :** हसूं नका, थट्टा नाहीं. मी येईन एकदां तुमच्याकडे.

[ इतक्यांत चतुर्भुज, मावशी आणि काका आंतून येतात.

**चतुर्भुज :** हेच ते श्रीमान् घोडके—

[ घोडके लवून नमस्कार करतो.

**मावशी :** बसा—बसा—माफ करा हं, कामांत होतें मी जरा. तसंच काम टाकून बाहेर आलें म्हणून कपडे आपले हे असे.

**घोडके :** मी कांहीं परका नाहीं.

**मावशी :** नाहीं तरी आमच्या या संपादकांना डोक्याचा भाग कमीच. एवढे मोठे लक्षाधीश व्यापारी पहिल्यानं घरीं येणार—आधीं कळवायचं तरी त्यांनीं ? एवढ्या मोठ्या माणसाचं आयत्या वेळीं आमच्यासारख्या गरिबांनीं स्वागत तरी कसं करायचं ?

**घोडके :** एवढा तुम्हीं माझा सन्मान केल्यानंतर, आतां निराळं स्वागत करायची जरूरीच काय ?

**मावशी :** छे, छे, असं म्हणून कसं चालेल ? बोला, काय घ्याल ? चहा—कॉफी—

**घोडके :** खरं सांगूं ? कांहीं नको ! आपल्या दर्शनानं मी माझी तहानभूक अगदीं पार विसरून गेलों आहे म्हणानात.

**मावशी :** ( लाजून ) इश्श !

**काका :** ( चतुर्भुजला ) काय नांव यांचं म्हणालांत ?

**जतुर्भुज :** घोडके ! ( घोडक्यांना ) हे काकासाहेब—म्हणजे यांचे—

**घोडके :** तें आलं लक्षांत—

[ काकासाहेबांना अदबीनें नमस्कार करतो.

**काका :** बसा, बसा बोडखे !

**मावशी :** बोडखे नाहीं—घोडके ! ( मोठ्यानें ) घोडके !

**काका :** घोडके ?

**मावशी :** हं ( घोडक्यांना ) कानांनीं जरा यांना कमी ऐकूं येतं—

**घोडके :** अस्सं !

**काका** : घोडके काय ? नांव कुठं तरी ऐकल्यासारखं वाटतं. कुठं बरं ? ( आठवण करतात ) बरोबर, आठवलं. पंधरा वर्षांपूर्वी आम्ही मुंबईला काकूबाईच्या खाणावळींत जेवत होतों. तिथं घोडके नांवाचा एक आचारी का वाढपी होता. तो कोण तुमचा ?

**मावशी** : ( रागानें ) भलतंच काय विचारतां ? म्हातारचळ लागलाय तुम्हांला ? प्रभात, अग प्रभात, इतका वेळ काय करते आहे ही आंत ?

[ घाईघाईनें आंत जाते.

**घोडके** : घ्या, काकासाहेब, सिगारेट घ्या ! ( काका भीतभीत सिगारेट घेतात. एकीकडे चतुर्भुजाला ) ' मावशी ' या नांवामुळें त्यांच्याविषयीं माझा गैरसमज झाला होता. मला वाटलं वयानं त्या चांगल्याच ' बुड्डो ' असाव्यात.

[ मावशी प्रभातच्या दंडाला धरून बाहेर आणते. काका घाईघाईनें सिगारेट विझवून टाकतात.

**मावशी** : लक्षाधिपती आहेत हे लक्षाधिपती ! आणि अजून यांचं लग्न देखील झालं नाहीं. लढाईत यांनीं किती पैसे मिळवले आहेत, ठाऊक आहे तुला ? दहा लक्ष रुपये ! बाई, बाई, बाई, दहा लक्ष म्हणजे किती झाले ! नाहीं तर आमचे हे ! यांच्या आयुष्यांत दोन लढाया होऊन गेल्या एवढ्या मोठ्या, पण यांनीं दहा कवड्या कांहीं मिळवून ठेवल्या नाहींत !

**काका** : अजून तिसरी लढाई व्हायची आहे. इतक्यांत का दम टाकतेस ?

**मावशी** : बस त्यांच्याजवळ, आणि बोल त्यांच्याशीं कांहींतरी !

**चंडोल** : ( इतका वेळ कसा तरी ह्यानें दम धरला होता ! ) मी येतों आतां–

**प्रभात** : ( मावशीला ) मी आलें यांना पोंहोचवून—

**मावशी** : हे कोण ?

**प्रभात** : हे सुप्रसिद्ध कवि चंडोल !

**घोडके** : अरे ! मी यांची ओळख करून द्यायला विसरलोंच !

**मावशी** : धंदा काय करतात हे ?

**चंडोल** : मी कविता करतों.

**घोडके** : येस्, ही मेक्स पोलट्री !

**मावशी** : कविता ?

**चंडोल** : हो, म्हणजे हे घोडके जसे पापड-मसाले-लोणचीं करतात कीं नाहीं—

**मावशी** : पगार किती मिळतो यांना ?

**प्रभात** : ( हंसून ) इश्श ! अग कविता करून कुठं पगार का मिळतो ?

**मावशी** : मग कशाला करतात कविता हे ?

**प्रभात** : अग, कीर्तीसाठीं. नांव केवढं मिळतं कविता करून !

**घोडके** : मी यांना शंभर रुपये पगारावर नोकरीला ठेवायला तयार आहें आमच्या कारखान्यांत !

**मावशी** : म्हणे नांव मिळतं ! पैसा नाहीं तर नुसत्या कीर्तीला घेऊन काय जाळायचं आहे ? महात्मा गांधींचं एवढं मोठं नांव आहे जगभर ! पण त्यांना नेसायला धोतर नाहीं कीं घालायला सदरा नाहीं !

**घोडके** : आणि राहतात जाऊन भंग्याच्या वस्तींत !

[ मोठ्यानें हसतो.

**प्रभात** : चला चंडोल—

[ दोघे जातात.

**चतुर्भुज** : मी जाऊं कां ? मला थोडंसं काम होतं—

**घोडके** : आतां तुम्ही आमची काळजी करूं नका ! तुम्ही बेलाशक जा. मावशींची अन् आमची आतां उत्तम दोस्ती जमली आहे. काय मावशी ?

[ मावशी लाजते. घोडके हंसतो. चतुर्भुज जातो. काकाही पुस्तकाच्या कपाटांतली सिगारेटची पेटी खिशांत घालायच्या उद्देशानें कपाटाच्या आजूबाजूला घोटाळत रहातात.

**मावशी** : ( लाडिकपणें ) रोज आम्ही तुमचे वर्तमानपत्रामध्यें फोटो पहातों. किती राजबिंडे दिसतां तुम्ही त्या फोटोंत ! तुम्हाला बघायची मला किती इच्छा होती म्हणून सांगूं ? घरांत आम्ही तुमच्या मसाल्यावांचून दुसरा मसालाच वापरीत नाहीं, नाहीं का हो ? ( काका दूर कपाटाजवळ आहेत त्यांना ) तिकडे काय करतां आहांत ? इकडे येऊन बसा.

[ काका मुकाट्यानें जवळ येऊन बसतात.

**घोडके** : ( गंभीरपणें ) पुष्कळांना वाटतं, कीं आतां आम्ही एवढे श्रीमंत झालेले असून हा पापड-मसाल्याचा धंदा अजूनही कां करतों ? तुम्हाला मी त्याचं कारण

सांगतों. ( मावशी उत्सुकतेनें ऐकूं लागतात ) मावशी, धंदा म्हणून मी या गोष्टीकडे बघत नाहीं. हें एक पवित्र व्रत आहे. केवळ स्त्रीवर्गाची सेवा करण्यासाठीं म्हणून मीं हें व्रत स्वीकारलं आहे.

**मावशी** : ( काकांना ) ऐकलंत का ?

**घोडके** : तुम्हाला ठाऊक आहे कीं पापड–मसाला–लोणचीं करण्यामध्यें आमच्या स्त्रीवर्गाचा निम्मा जन्म जातो. पुरुषांनीं या गोष्टीचा कधीं विचार केला आहे का ? मीं याचा विचार केला आहे. म्हणून ( पवित्र्यांत उभा राहून ) स्वयंपाक-घराच्या गुलामगिरींतून स्त्रियांची सुटका करण्यासाठीं महाराष्ट्रांत या घोडक्यानें अवतार घेतला आहे !

[ मावशी टाळ्या वाजवितात. त्यांच्या टाळ्या संपल्यावर काका ' हिअर, हिअर ' म्हणून दोनच टाळ्या वाजवितात.

**मावशी** : सभेंत जर तुम्हीं असं व्याख्यान दिलंत किनई घोडके, तर त्या जवाहरलाल नेहरूसारख्या टाळ्या घ्याल. ( उठून ) अजून काय करते आहे ही प्रभात बाहेर ? ( प्रभात आंत येते. ) अग, आतां यांनीं किती सुंदर भाषण करून दाखविलं म्हणून सांगूं ! घोडके, पुन्हां म्हणून दाखवा हो तें—

**प्रभात** : माझं डोकं दुखतंय् फार. मी आंत जाऊन झोपते.

[ आंत निघून जाते. मावशी रागानें तिच्याकडे पहाते.

**काका** : ( घोडक्याला एक करंगळी दाखवून ) मीहि जाऊन येतों बाहेरून.

[ काका जाऊं लागतात.

**मावशी** : ( रागानें ) तुम्ही कुठं चाललांत ?

**घोडके** : त्यांना जाऊं द्या. ( काका घाईघाईनें जातात. ) आमच्यावर फारशा खूष दिसत नाहींत प्रभातदेवी.

**मावशी** : तिला काय कळतंय् ? अजून लहान आहे ती !

**घोडके** : मीं त्यांना लहानशी भेट म्हणून ही एक अंगठी आणली होती.

[ खिशांतून अंगठीची पेटी काढतो.

**मावशी** : बघूं द्या मला. ( पेटींतली अंगठी काढून बघते. ) अगबाई, किती सुंदर आहे ही अंगठी ! ( स्वतःच्या बोटांत घालते ) माझ्या बोटांत फारच शोभून दिसते–नाहीं ? केवढ्याची आहे ही ?

**घोडके** : पांचशाची !

**मावशी** : आमच्या प्रभातनं तर एक हजाराच्या खालीं हातांत अंगठींच घालायची नाहीं असा निश्चय केला आहे !

**घोडके** : अस्सं, मग ही तुम्हीच ठेवून द्या ! मी त्यांच्यासाठी दोन हजारांची दुसरी अंगठी घेऊन येईन. उद्यां तुम्ही आमच्या घरीं जेवायला याल किनई—

**मावशी** : तुमच्या घरीं, अन् जेवायला ?

**घोडके** : तेंच तर तुम्हांला सांगायला म्हणून मी मुद्दाम आज आलों होतों. तुम्हांला पाहिलं अन् सारं विसरून गेलों. बरं, उद्यां संध्याकाळीं तुम्ही, प्रभातदेवी आणि काकासाहेब—

**मावशी** : त्यांना नको. त्यांना रात्रीचं जेवण सोसत नाहीं.

**घोडके** : ठीक आहे. मग तुम्ही दोघीजणीं या. मी माझी मोटार पाठवून देतों. जेवण संपल्यानंतर कुठल्या तरी सिनेमाला जाऊं आपण चांगल्याशा !

**मावशी** : ठीक आहे.

**घोडके** : मग येतों मी. प्रभातदेवींना माझा नमस्कार सांगा आणि त्यांना घेऊन यायला विसरूं नका.

[ नमस्कार करून जातो. मावशी त्याला पोंहोचवायला बाहेर जाते व हातांतल्या अंगठीकडे पहात हंसत हंसत आंत येते. मग तिला प्रभातची आठवण होते. तसा तिचा चेहेरा रागीट होतो.

**मावशी** : ( मोठ्यानें ) प्रभात, अग प्रभात, बाहेर ये बघूं.

**प्रभात** : ( डोळे चोळीत बाहेर येते. ) काय मावशी ?

**मावशी** : ( रागानें ) काय, झालंय् काय तुला आज ? एवढा मोठा लक्षाधिपति व्यापारी माणूस आपण होऊन घरीं आला आपल्या ! तर तूं त्याच्याशीं एक अक्ष बोलली नाहींस कीं ढुंकून त्याच्याकडे पाहिलं देखील नाहींस ! खुशाल आपल तरातरा त्यांच्या अंगावरून काय गेलीस आणि आंत जाऊन काय झोपलीस ! ही काय रीत झाली ?

**प्रभात** : चांगली ओळख झाल्याखेरीज मला नाहीं बोलतां येत नवीन माणसाशीं

**मावशी** : अन् तो चंडोल का चंडेल कोण आला होता ? भिकारी मेला— त्याच्याबरोबर बाहेर जाऊन तेवढं चुरुचुरु बोलायला त्याची अन् तुझी कोणत्य जन्मीं ओळख झाली तें तर मला सांग !

**प्रभात :** चंडोल कवींची योग्यता तुला काय ठाऊक ? सारा महाराष्ट्र त्याला आज डोक्यावर घेऊन नाचतो आहे !

**मावशी :** अन् घोडक्यांना तर सारं हिंदुस्थानच काय पण सारं जग डोक्यावर घेऊन नाचतं आहे ! दहा लाख रुपये मिळवले लढाईत त्यांनीं—दहा लाख रुपये ! त्यांचे बूट पुसायची तरी तुझ्या या चांडाळ कवीची लायकी आहे का ? भीकमाग्या मेला ! आला तो आला अन् दिवाणखान्यांतला माझा कोच खराब करून गेला—

**प्रभात :** ( रागानें ) मावशी—

**मावशी :** रोज रोज मी आपलं पहातें आहे तों तुझं एकेक वाढतच चाललं आहे ! तुझ्यासारख्या श्रीमंत मुलीला हा कवितेचा दरिद्री नाद शोभत नाहीं. जेव्हां पहावं तेव्हां आपली कविता वाचते आहे अन् कविता खरडते आहे. दुसरा उद्योग नाहीं. आणि आज बघतें आहे तों हा चांडाळ कवि खुशाल आपला घरांत घेऊन आलीस ! हें कवीचं अन् कवितेचं वेड आतां डोक्यांतून काढून टाक बरं का प्रभात !

**प्रभात :** अन् काय करूं मी ?

**मावशी :** वर उलट मलाच विचारतेस ? आतां का तूं लहान आहेस प्रभात ? बी. ए. होऊन एक वर्ष झालं तुला. तुझं शिक्षण संपलं, सगळं कांहीं झालं. आतां लग्नाचा विचार नको का करायला तुला ?

**प्रभात :** लग्नाचा विचार करून का कुठं लग्न होतं, मावशी ? वेळ आली म्हणजे सगळं जमून येईल.

**मावशी :** वेळ आल्यानंच सगळं होणार असेल तर मग आम्ही कशाला आहोंत इथं जिवंत ? तूं हो म्हणायचा अवकाश. नाहीं पांच मिनिटांच्या आंत तुझं लग्न जमवलं तर नांवाची मावशी नाहीं !

**प्रभात :** ( हंसून ) माझं लग्न ठरवायचा एवढा उत्साह तुला कां आला हें आलं माझ्या ध्यानांत. मला ठाऊक आहे तुझ्या डोक्यांत कोण आहे तें.

**मावशी :** कोण ?

**प्रभात :** दुसरा कोण ? हा—हा आत्तां आलेला पापडवाला.

[ मोठ्यानें हंसते.

**मावशी :** ( रागावून ) एवढं हंसायला काय झालं ?

**प्रभात :** अहाहा, काय नांव त्याचं ? तर म्हणे घोडके ! आणि धंदा काय ? तर म्हणे

पापड, मसाले आणि लोणचीं करण्याचा! (हंसते) त्याच्याशीं लग्न लावून मी काय ठमाबाई घोडके बनूं आणि लोणच्याच्या बरण्या डोक्यावर घेऊन गांवभर हिंडूं होय ओरडत कीं 'लोणचं घ्यायचंय कां हो लोणचं'?

**मावशी :** तुला त्यांच्या नांवाशीं न् धंद्याशीं करायचं काय? तुझ्या वडिलांनीं जसा कापडावर पैसा मिळवला तसा त्यानं पापडावर मिळवला. त्यांत हंसायला काय झालं? किती झालं तरी तो आज लक्षाधिपति आहे. दहा लाख रुपये आहेत त्याच्याजवळ. शिवाय दागदागिने, बंगले, मोटारी, नोकर चाकर–कांहीं कमी आहे का त्याला?

**प्रभात :** मला लोणचेवाल्याशीं लग्न करायचं नाहीं! मग तो कुबेराचा काका का असेना!

**मावशी :** पुन्हां आपलं तेंच. अग, आज जगांत पैशाला मान आहे. पैसा आहे तिथं अब्रू आहे, लौकिक आहे, सारं कांहीं आहे. धंद्याला विचारतो कोण?

**प्रभात :** पण मला दुसऱ्याच्या पैशाला घेऊन करायचंय काय? मला स्वतःला काय भीक लागली आहे?

**मावशी :** इतकी शिकलीस पण काडीचं शहाणपण नाहीं ग तुला! दुसऱ्याचा पैसा आपल्या घरांत आला तर भीक का लागेल तुला? लक्ष्मीला कधीं नाहीं म्हणूं नये.

**प्रभात :** अग, पण त्या माणसाचं शिक्षण नको कां पहायला! 'आय् इझ धी घोडके'–ही तर त्याची अक्कल!

[ हंसते.

**मावशी :** नुसत्या शिक्षणाला काय जाळायचंय? पैसा असला म्हणजे छप्पन विद्वान् पदरीं ठेवतां येतात! बरं, तो शिकलेला नसला म्हणून तूं तर शिकलेली आहेस ना? नवरा–बायकोपैकीं कोणी तरी एकानं शिकलेलं असलं म्हणजे झालं!

**प्रभात :** म्हणजे माझं त्याच्याशीं अगदीं लग्न ठरल्यासारखंच तूं बोलूं लागलीस कीं! अग वा ग वा! कांहीं तरीच! ज्याचं नांव काढलं तर मला ओकारी येईल अशा माणसाची बायको म्हणून मी जगांत एक दिवस तरी हिंडूं शकेन का!

**मावशी :** लग्न लागल्यानंतर नवऱ्याबरोबर हिंडलं पाहिजे असं थोडंच आहे! लग्न लागल्याशीं आपल्याला कारण! एकदां नवऱ्याचा पैसा हातीं आला, दागदागिने मिळाले, म्हणजे त्याला विचारतंय कोण?

**प्रभात :** अन् त्याचीं तीं मुलं—( ओकारी आल्यासारखें करून ) इऽग बाई! खरंच, ज्या माणसावर प्रेम नाहीं त्याच्याशीं लग्न करणं मला जन्मांत शक्य नाहीं!

**मावशी :** अगदींच मूर्ख आहेस! लग्नाच्या आधीं पुरुषावर कुठं प्रेम बसत असतं होय? आयुष्य म्हणजे काय कादंबरी आहे? नाटक आहे? का सिनेमा आहे! तुझ्या काकांशीं मीं लग्न केलं त्या वेळीं त्यांच्यावर माझं प्रेम का होतं? त्यांच्यावर प्रेम बसणं कधीं शक्य तरी आहे कुणाचं? मीं त्यांच्याशीं लग्न केलं नसतं तर आतांपर्यंत त्यांचं लग्न झालं नसतं, समजलीस!

[ आंतून काका रागावून येतात.

**काका :** खोटं आहे—

**मावशी :** काय खोटं आहे?

**काका :** तुझ्याशीं लग्न करायच्या आधीं माझीं दोन लग्नं झालीं होतीं! एवढी घमेंड नको बाळगूंस! अन् तशी वेळ आली तर आणखी चवथं लग्नसुद्धां करून दाखवीन!

**मावशी :** चवथं लग्न करून दाखवाल!

**काका :** हो, हो, चवथं लग्न करून दाखवीन.

**मावशी :** दाखवा पाहूं!

**काका :** तूं आधीं मरून दाखव पाहूं!

**मावशी :** ( त्यांच्या अंगावर धांवून ) चला, चालते व्हा इथून, माझ्या मरणावर टपलांत काय?

**प्रभात :** ( काकाच्या गळयांत हात घालून मोठयानें हंसते. आणि लाडिकपणें म्हणते ) बिचारे माझे काका! तुम्ही नका हो ऐकूं मावशीचं!

**मावशी :** आधींच ते माझं फार ऐकतात. आणखी तूं नको त्यांना मथवूंस. म्हणे बिचारे काका! बरे बिचारे असतील! दोन बायका खाऊन टाकल्या, तशी मला एकदां खाऊन टाकतील तेव्हां त्यांचं सामाधान होईल!

[ तणतणत आंत निघून जाते

**काका :** तो बोडखे आपल्यापासून तिचं डोसकं फिरलं आहे डोसकं!

[ प्रभात हंसते. पडदा पडतो.

# २

चंडोल कवीची खोली. वातावरण पूर्वीचेंच. फक्त टेबलावर प्रभातचा एक सुंदर फोटो ठेवलेला दिसतो आहे. चंडोल दिलरुबा वाजवीत स्वतःशींच तांबे कवींचें एक भावगीत गात बसलेला आहे.

कळा ज्या लागल्या जीवा, मला कीं ईश्वरा ठाव्या !
कुणाला काय हो त्याचें ? कुणाला काय सांगाव्या ?
उरीं या हात ठेवोनी उरींचा शूल का जाई ?
समुद्रीं चहुकडे पाणी पिण्याला थेंबही नाहीं !
कशी साहूं पुढें मागें जिवाला ओढ जी लागे,
तटातट् काळजाचे हे तुटाया लागती धागे !

गाणें संपतांच घोडके बाहेरून दार ठोठावतो. चंडोल दिलरुबा टेबलावर ठेवून उठतो.

**घोडके** : ( आंत येत ) नमस्कार म्हटलं, कविराज !

**चंडोल** : ( आश्चर्यानें ) अरेच्या, तुम्ही कसे आमच्याकडे ?

**घोडके** : कसे म्हणजे, तुमच्या दर्शनाला. गेले आठ दिवस तुमच्याकडे येईन येईन म्हणतों आहें, पण आमच्यासारख्या पब्लिक माणसाला वेळ कुठं मिळतोय ? सकाळपासून संध्याकाळपर्यंत आम्ही भयंकर बुझी !

**चंडोल** : बुझी ? हं–हं–बिझी !

**घोडके** : हो, बिझी का बुझी काय म्हणतां तुम्ही तें ! ( हातामधला मसाल्याचा एक डबा टेबलावर ठेवीत ) हा आमच्या मसाल्याचा एक डबा ठेवून द्या पाहूं तुमच्याकडे.

**चंडोल** : अहो, पण मी कांहीं स्वयंपाक करीत नाहीं घरांत ! मला तुमच्या मसाल्याचा काय उपयोग ? आमचं घर म्हणजे धर्मशाळा आहे नुसती !

**घोडके** : सकाळीं उठून हा नुसता चिमूटभर तोंडांत टाका हो. जेवायची जरूरीच नाहीं ! अन् कविता करायला अशी स्फूर्ति येईल तुम्हांला म्हणतां !

**चंडोल** : लोणचीं मसाल्याच्या कारखान्याबरोबर तुम्ही विनोदाचाही बराच मोठा कारखाना उघडल्यासारखा दिसतो आहे !

**घोडके** : तें कांहीं विचारूं नका. आमचा विनोद ऐकून त्या दिवशीं मावशी तर इतक्या पोट धरधरून हंसल्या, कीं सांगतां सोय नाहीं. तुमच्या अंगांत काव्याचा जसा जन्मजात गुण आहे, तशी आम्हांलाही ही विनोदाची उपजत देणगीच आहे म्हणानात. आमचे फादर म्हणजे भयंकर फनी ! ( रवीन्द्रनाथ टागोरांचा फोटो बघून ) हा कोणाचा फोटो ? आपल्या वडिलांचा वाटतं !

**चंडोल** : छे, छे, अहो, ते रवींद्रनाथ टागोर !

**घोडके** : टागोर ? नांव कुठं तरी ऐकल्यासारखं वाटतं ! कुठं असतात हे ?

**चंडोल** : स्वर्गात. वारले ते.

**घोडके** : अरे, अरे, फार वाईट झालं—

**चंडोल** : आतां वारल नाहींत ते. त्यांना वारून पुष्कळ वर्षं झालीं.

**घोडके** : होय का ? मग हरकत नाहीं. बरं, तें जाऊं द्या. आमच्या त्या दिवशींच्या प्रश्नाचं काय केलंत तुम्हीं ?

**चंडोल** : कोणता प्रश्न ?

**घोडके** : भले ! विसरलांत वाटतं ?

**चंडोल :** असं, असं ! म्हणजे तुमच्या पापड–मसाल्यावर अन् लोणच्यावर दर महिन्याला मीं कविता करून द्यायच्या–तोच प्रश्न म्हणतां ना ?

**घोडके :** भले, कसं बोललांत !

**चंडोल :** मला वाटलं तुम्ही थट्टा करीत होता त्या दिवशीं माझी !

**घोडके :** थट्टा ? छे, हो ! इतकं जीव तोडून त्या दिवशीं मीं तुम्हांला विचारलं अन् तुम्हांला ती काय थट्टा वाटली ? महिना शंभर रुपये पगार देईन म्हणून देखील तुम्हांला सांगितलं ! अजून तुम्हांला खरं वाटत नसेल तर दोन महिन्यांचा अगाऊ पगारच देऊन टाकतों पाहिजे तर. म्हणजे मग तुमची खात्री पटेल.

[ खिशामधून चेक. बुक काढूं लागतो.

**चंडोल :** राहूं द्या हो. पापड–लोणच्यावर कविता करायला पैसे कशाला पाहिजेत ? अन् शिवाय त्याचं असं आहे, कीं पैसे घेऊन मी कविता कधीं करीत नाहीं.

**घोडके :** काय म्हणतां ? फुकट कविता करतां तुम्ही ? म्हणूनच तुम्ही कवि लोक हे असे दरिद्री रहातां ! भाडं काय या खोलीचं ? ( चंडोल हंसण्यावारी नेतो. ) म्हणजे, भाडं आहे ना या खोलीला ?

**चंडोल :** आहे तीन रुपये महिना ! परवां चार महिन्यांचं भाडं थकलं होतं माझं–तर चाळीच्या कारकुनाची अन् माझी केवढी मारामारी जुंपायची वेळ आली होती इथं ! ऐन वेळीं आपले संपादक आले म्हणून तो लेकाचा वांचला.

**घोडके :** अरे, अरे, अरे ! महाराष्ट्राचे ऐवढे मोठे कवि तुम्ही, चंडोल ! काय ही तुमची स्थिति ! आणि त्यांतून आमच्यासारखे मित्र तुम्हांला असतांना ? तुम्ही आम्हांला नुसता हुकूम द्या. ऐसा सुंदर बंगला उठवून देतों तुमच्यासाठीं गांवाबाहेर नदीकाठीं ! कीं जन्मभर तुम्ही आरामशीर खुर्चीवर पडून कविताच करीत रहाल.

**चंडोल :** म्हणजे तुमच्या त्या पापड–लोणच्यावरच्या ? माफ करा !

[ मोठ्यानें हंसतो.

**घोडके :** ( टेबलावरील प्रभातचा फोटो बघून ) अरेच्या ! हा प्रभातदेवींचा फोटो तुमच्याकडे कसा अला ?

**चंडोल :** कसा आला म्हणजे ? त्यांनीं मला नजर–भेट दिला !

**घोडके :** फारच लहान आहे हा. त्यांनीं मला भेट दिलेला फोटो किती तरी

मोठा आहे याच्यापेक्षां ! मीं तो निजायच्या खोलींत माझ्या बिछान्यासमोर लावून ठेवला आहे सुंदर सोनेरी फ्रेममध्यें. रोज निजण्यापूर्वी एकदां त्या फोटोकडे पाहिलं कीं अशी छान झोंप येते म्हणतां मला.

**चंडोल** : माझं उलटं आहे. निजायच्या पूर्वी मीं या फोटोकडे पाहिलं म्हणजे रात्रभर माझ्या डोळ्याला डोळा लागत नाहीं !

**घोडके** : तें कां ?

**चंडोल** : तें प्रेमाचं शास्त्र आहे. मसाल्याचं नाहीं. तें तुम्हाला नाहीं कळायचं. अस्सं, एकूण बरीच ओळख झालेली दिसते तुमची न् प्रभातदेवींची अलिकडे !

**घोडके** : म्हणजे काय, त्यांची अन् माझी गांठ पडली नाहीं असा एक दिवस जात नसेल तेव्हांपासून ! जशी कांहीं पुष्कळ वर्षांची ओळखच असावी अशी आमची दोस्ती झाली आहे सध्यां. प्रभातदेवींना आमचे पापड न् मसाले फारच आवडतात.

**चंडोल** : प्रभातदेवींना माझ्या कविता अतिशय आवडतात.

**घोडके** : अस्सं ? मला कधीं बोलल्या नाहींत त्या तुमच्या कवितेबद्दल !

**चंडोल** : मलाही कधीं बोलल्या नाहींत त्या तुमच्या पापड–मसाल्याबद्दल !

**घोडके** : म्हणजे, तुमची न् त्यांची गांठ पडते वाटतं अधूनमधून ?

**चंडोल** : त्यांची न् माझी गांठ पडली नाहीं अशी एक संध्याकाळ जात नसेल ! आपल्या नदीच्या कांठीं ती बनेश्वराची बाग आहे ना ? त्या बागेंत रोज आम्ही तास न् तास काव्याच्या गप्पा मारीत बसतों. मी त्यांना माझ्या कविता म्हणून दाखवितों, त्या मला आपल्या कविता गाऊन दाखवितात. असा कांहीं रंग भरतो आमच्या काव्यशास्त्रविनोदाला म्हणतांय ! ( घोडके आंतून अगदीं प्रक्षुब्ध होतो. ) काय हो, असा कां चेहरा झाला तुमचा ?

**घोडके** : ( सांवरून ) माझं लक्षच नव्हतं तुमच्या बोलण्याकडं. काय म्हणालांत तुम्ही ?

**चंडोल** : नाहीं म्हटलं, तुम्ही न् प्रभातदेवी जेव्हां रोज भेटतां, तेव्हां तास न् तास गप्पा तरी कसल्या चालतात तुमच्या ? पापडाच्या, मसाल्याच्या, का लोणच्याच्या ?

**घोडके** : भले ! म्हणजे काव्याबद्दल आम्ही बोलत नाहीं असं का तुम्हांला वाटतं ?

परवांच तुमच्या काव्याबद्दल मी त्यांच्याशीं बोलत होतों, तेव्हां त्यांनीं असा वाईट चेहरा केला म्हणताय्—

**चंडोल** : अस्सं ? पण काल मी तुमच्या लोणच्याबद्दल त्यांना थोडंसं कुठं बोललों, तर त्यांनीं एकदम ओकारी आल्यासारखा चेहरा केला !

**घोडके** : टाळी द्या. जिरली आमची. अगदीं तुम्ही आमच्यासारखाच विनोद करतां कीं ! ( मोठ्यानें हंसतो. नंतर गंभीर चेहेरा करून ) बरं, तें जाऊं द्या, ज्या कामासाठीं आम्ही आज तुमच्याकडं आलों आशेनं त्याचं काय करतां ? हें पहा चंडोल, थट्टा नाहीं. अगदीं सीरीयली मी तुम्हाला विचारतों. देवाच्या दयेनं आज तुमच्याजवळ बुद्धिमत्ता आहे अन् माझ्याजवळ पैसा आहे. नुसत्या बुद्धीला आज जगांत कवडीचीही किंमत नाहीं—वाईट आहे हें—पण त्याला कांहीं इलाज नाहीं. मजजवळ पैसा आहे म्हणून जग आज माझ्या पायांपाशीं लोळण घेत आहे; आणि तुमच्याजवळ आज पैसा नाहीं म्हणून तुम्हांला या असल्या उकिरड्यामधें लोळत पडावं लागतं आहे. पैशांच्या जोरावर सारं जग मी खरेदी करूं शकतों—माझी हिंमत आहे. नुसत्या कवितेच्या बळावर तुम्ही काय करूं शकतां ? सांगा. म्हणून म्हणतों, तुमची बुद्धि आणि माझा पैसा एकत्र येऊं द्या. साऱ्या जगाला आपण आग लावून टाकूं ! ( चंडोल हंसतो. ) हंसूं नका. तुमची तयारी असेल तर तुमची सारी बुद्धिमत्ता आणि कविता, तुम्ही सांगाल त्या भावानं—अगदीं—एका रकमेनं खरेदी करायला तयार आहोंत आपण. ( चेक. बुक टेबलावर आपटीत ) चला, आतांचे आतां कॉंटॅक्ट करा—कॉंटॅक्ट करा !

**चंडोल** : काय हो श्रीमान् घोडके, माझी बुद्धि अन् कविता म्हणजे तुम्हांला काय वाण्याच्या दुकानामधला गूळ न् साखऱ्या वाटला होय ? कीं चार पैसे फेंकले त्याच्या अंगावर, कीं वाटेल त्या रस्त्यावरच्या गिऱ्हाइकाला तो विकत घेतां येईल ?

**घोडके** : रागावूं नका कविराज. पण दुनिया हा एक बाजारच आहे,—नाहीं तर काय ? पैशानं विकत घेतां येणार नाहीं अशी एकही चीज या दुनियेंत नाहीं. खरं सांगूं ? तुमच्या साऱ्या कवितेसकट तुम्हांला विकत घेण्याचं सामर्थ्य या एका चेकमध्यें आहे. समज़लांत मेहेरबान ?

**चंडोल** : मूर्ख आहांत ! लोणचीं न् मसाले विकून मिळविलेल्या घाणेरड्या संपत्तीचा माज चढला आहे तुमच्या डोळ्यांवर ! या जगांतली एकही मौल्यवान्

गोष्ट तुम्हांला पैशानं विकत घेतां यावयाची नाहीं. ज्ञान, प्रेम, मैत्री, शील, निष्ठा या गोष्टी विकत घ्यायला तुमचीच काय पण कुबेराची संपत्ति देखील पांगळी पडेल !

**घोडके :** ज्ञानाचं आणि गुणांचं खोटं महत्त्व तुमच्यासारख्या कंगालांनीं वाढवून ठेवलं आहे या जगांत ! जिवंत रक्तामांसाचीं वाटेल तीं माणसं जिथं विकत घेतां येतात पैशानं, तिथं त्यांच्या गुणाची आणि प्रेमाची परवा करतंय कोण ! तुमच्यासारखे सतराशें छपन्न कवि मसाले कुटायला मजूर म्हणून मी माझ्या कारखान्यांत ठेवूं शकतों. जगावर आज पैसा राज्य करतो आहे पैसा !

**चंडोल :** पैशाच्या सामर्थ्यानं जगावर हुकमत चालविणारीं राक्षसी साम्राज्यं तुमच्या आमच्या डोळ्यांदेखत लौकरच धडाधड कोलमडून पडतील ! उद्यांच्या जगांत आमच्यासारखे कंगाल—आमच्यासारखे गरीब—आमच्यासारखे मजूर राज्य करणार आहेत, लक्षांत ठेवा !

**घोडके :** ( शांतपणें ) ठीक आहे. जातों मी. तुम्ही कंगाल लोक जगाचे राजे झाल्यानंतर मग—म्हणजे उद्यांच तुम्हाला भेटूं. तोंपर्यंत नमस्कार !

**चंडोल :** ( कुर्य्यानें ) नमस्कार !

[ घोडके जाऊं लागतो.

**घोडके :** ( मागें वळून ) हो, तोंपर्यंत तुम्हांला विनंती एवढीच आहे, कीं तुम्हीं या मुलीचा नाद सोडून द्या—

**चंडोल :** मुलीचा नाद ! ( तुच्छतेनें हंसतो ) तो कां ?

**घोडके :** ( कठोरपणानें ) सुदर मुलीवर प्रेम करण्याचा कंगालांना अधिकार नाहीं !

**चंडोल :** अस्सं ! सुंदर मुलीवर प्रेम करण्याचा मक्ता जगांत काय एकट्या श्रीमंतांनाच दिला आहे वाटतं ?

**घोडके :** येस, हॉप क्रोस ! सुंदरच काय, पण जगांतल्या कसल्याही मुलीवर किंवा मुलीशीं कांहींही करण्याचा कंगालांना अधिकार नाहीं ! काय रे कवि, तुला काय वाटतं कीं प्रेमाच्या चार पाणचट कविता खरडल्यानं ही पोरगी तुझ्यावर भाळेल—होय रे ? ( तुच्छतेनें हंसून ) अगदींच कवि आहेस झालं !

**चंडोल :** मग तुझ्या अंगाला येणाऱ्या लोणच्याच्या वासावर खूष होईल अशी तुझी समजूत आहे होय रे लेका घोडक्या !

**घोडके :** ( चिडून ) वेळ आली म्हणजे सांगेन तुला. ( हातांतलें घड्याळ बघून ) जातों मी. प्रभातदेवींना घेऊन मला सिनेमाला जायचंय.

**चंडोल :** ( ओरडून ) कोणाला घेऊन ?

**घोडके :** ( तितक्याच स्वरांत ओरडून ) प्रभातदेवींना घेऊन मला सिनेमाला जायचंय म्हटलं ! ( खिशांतलीं तीन तिकिटं दाखवीत ) हीं बघितलींस तीन तिकिटं बॉक्सचीं ! मी–मावशी–अन् ती ! ह–ह–हॅं ! मावशी इकडं बसणार, मी इथं बसणार, अन् ती इथं माझ्या शेजारीं बसणार. खांद्याला खांदा लावून. आणि मग सिनमा सुरू होऊन थिएटरांत अंधार पडल्यावर—

**चंडोल :** ( रागानें ओरडून ) शट् अप् ! तुझ्यासारख्या मसालेकुट्याबरोबर ती सिनेमाला जाणं शक्यच नाहीं मुळीं !

**घोडके :** मग तुझ्यासारख्या कंगाल कवितारखड्यांबरोबर ती भराऱ्या मारायला येईल होय रे बनेश्वराच्या बागंत ? वाट पहात बैस. बायकांचं प्रेम शब्दांच्या अलंकारापेक्षां सोन्याच्या अलंकारावर अधिक असतं, हें त्यांच्या स्वभावांतलं रहस्य कळायला तुला अजून वेळ आहे बेटा !

**चंडोल :** प्रभातदेवी म्हणजे सोन्याच्या दागिन्यावर आषक होणारी एक सामान्य स्त्री आहे असें तूं समजतोस होय ?

**घोडके :** जाऊं दे कीं–व्हाय चर्चा ? जातों मी. ( दारापाशीं गेल्यावर वळून ) अजून विचार कर. बोल, केवढ्यांचा फाडूं चेक ?

**चंडोल :** ( रागानें उसळून ) तुझ्या चेक. बुकाचं अन् पैशांचं लोणचं घाल–जा ! हरामखोर—

**घोडके :** बरं आहे. आतां तुमची आमची भेट आमच्या लग्नाचीं मंगलाष्टकं करायला तुम्हांला आम्ही बोलावूं किनई तेव्हां पडेल !

[ मोठ्यानें हंसत जातो.

**चंडोल :** ( त्याच्या अंगावर धांवून जात ) बदमाष–

[ कांहीं वेळानें परत येऊन खाटेवर पडतो. त्याचा राग अतिशय अनावर झालेला असतो. इतक्यांत नीरा घाईघाईनें आंत येते.

**नीरा :** कोणाशीं बोलत होता एवढं मोठ्यामोठ्यानं ?

**चंडोल :** त्या पापडवाल्याशीं ! असा तिळपापड झाला आहे माझ्या अंगाचा—

**नीरा :** कोणाबद्दल म्हणतांय् तुम्ही ?

**चंडोल :** तो घोडके मसालेवाला हो !

[ नीरा दचकते.

**नीरा :** ( कठोर स्वरांत ) इथं कशाला येऊं दिलंत तुम्हीं त्याला ?

**चंडोल** ( दचकून ) कां ?

**नीरा :** ( त्वेषानें ) फार वाईट माणूस आहे तो. त्याला पुन्हां या खोलींत पाय टाकून देऊं नका !

[ चंडोल नीरेच्या चेहऱ्याकडे आश्चर्यानें पहातो. पडदा पडतो

# [ २ ]

प्रभातच्या बंगल्याबाहेरचा बाग. काका प्रवेश करतात. त्यांच्या हातांत नुसती एक काड्याची पेटी आहे. ते विडी सिगारेटच्या शोधांत आहेत. पलिकडून माळी चालला आहे.

**काका :** माळी, ए माळी, इकडे ये. ( माळी जवळ येतो, त्याला हलकेंच ) अरे, तुझ्याजवळ एखादी विडी आहे का ?

**माळी :** नाहीं साहेब.

**काका :** बघूं दे मला तुझ्या कानावर—

**माळी :** थोटुक आहे साहेब. माझं उष्टं.

**काका :** चालेल. दोन झुरके तर मारतां येतील ना ?

**माळी :** तुम्हांला विडी देतांना बाईसाहेबांनीं, मला पाहिलं म्हणजे लाथ मारून हांकून देत्याल मला त्या.

**काका :** म्हणजे तूं देखील तिला भितोस वाटतं ? मला वाटलं, मी एकटाच भितों तिला !

[ माळी जातो. काका काडी ओढतात आणि विडी पेटवल्यासारखें करून डाव्या मुठीचा नुसताच झुरका ओढतात, आणि तोंडानें धूर सोडण्याचा अभिनय करतात. इतक्यांत घोडके येतो.

**घोडके :** नमस्कार काकासाहेब.

**काका :** ( चटकन् खिशांत आगपेटी घालून हातानें धूर हांकलल्याचा अभिनय करीत. ) या, बोडखे या.

**घोडके :** घोडके प्लीज—

**काका :** माफ करा. माझ्या तोंडांत पहिल्यापासून आपलं बोडखेच बसलं आहे.

**घोडके :** मावशी कुठं आहेत ?

**काका :** असेल घरांत. मला ठाऊक नाहीं. ( मोठ्यानें ) ए माळी, अरे तिला हांक मार. म्हणावं बाहेर बोडखे आलेत—

**घोडके :** घोडके—

**काका :** पाहिलंत, हें अस्सं होतं. कांहीं लक्ष्यांतच रहात नाहीं.

**घोडके :** वयोमनाप्रमाणं चालायचंच—

**काका :** तसं माझं कांहीं वय झालं नाहीं–बो–बो–घो—

**घोडके :** घोडके—

**काका :** घोडके ! हा सारा लग्न केल्याचा परिणाम आहे. आयुष्यांत मीं एकंदर तीन लग्नं केलीं आहेत आतांपर्यन्त. त्या मानानं अद्यापि मी इतकं तरी आठवूं शकतों हें कांहीं कमी नाहीं. खरं सांगूं तुम्हांला ? लग्नाचा परिणाम जर कशावर अधिक होत असेल तर तो मेंदूवर ! स्मरणशक्तिच अजिबात नाहींशी होते. आतां बघा, मला माझ्या पहिल्या बायकोचं नांव कांहीं आठवत नाहीं.

**घोडके :** जाऊं द्या–नाहीं आठवलं तर नाहीं आठवलं. मेलेल्या बायकोचं नांव आठवून आतां कांहीं उपयोग आहे का ? पण तशी आपली एकंदर प्रकृति तर ठीक आहे ना ?

**काका :** लग्न झालेल्या माणसाला कुठं प्रकृति असते, बोडखे ? माझ्या चेहऱ्याकडे बघून तुमची कल्पना तरी होईल का, कीं एक वेळ हा माणूस पोलिस खात्यांत अंमलदार होता म्हणून ?

**घोडके :** ( हंसून ) काय म्हणतां, तुम्ही पोलिसखात्यांत अंमलदार होता काकासाहेब ?

**काका :** तर काय ! चोराच्या आळंदीला दहा वर्षे फौजदार होतों ना मी ! काय त्या वेळेला प्रकृति होती म्हणतां माझी ? असा रस्त्यावर उभा राहिलों डोक्यावर काळी पगडी चढवून कीं शनिवारवाड्याच्या बुरजासारखा दिसायचा मी ! ह्या

एकेक त्या वेळेला माझ्या मिशा! असा दरारा असायचा म्हणतां गांवांत माझा. नुसतं नांव काढलं माझं कीं पोरं घाबरून अंथरुणांत आपलीं हे-हे-हे करायचीं! (विषादानें) आणि आतां बघा.

**घोडके :** पण तुमचं हें असं व्हायचं कारण?

**काका :** कारण लग्न! एक सोडून तीन. त्यांतलं हें तिसरं लग्न तर फारच बाधलं! दोन लग्नांतून कशीबशी उरलेली प्रकृति तिसऱ्या लग्नांत तर अगदीं सफा झाली. खरं सांगूं बोडखे, माझं तर असं ठाम मत आहे कीं, पुरुषांनीं मुळीं लग्नच करूं नये.

**घोडके :** अन्-बायकांनीं?

**काका :** तो त्यांचा प्रश्न आहे. आपल्याला त्याच्याशीं काय करायचंय?

**घोडके :** पण पुरुषांनीं लग्नं केलीं नाहींत तर जग चालणार कसं?

**काका :** जग कसं चालणार याची काळजी करायला तो आपला बाप बसला आहे कीं वर! तुम्हाआम्हांला त्याच्याबद्दल विनाकारण टाळकीं खाजवायचं कारण आहे कां बोडखे?

**घोडके :** बरं जाऊं द्या. एक सिगारेट तर घ्याल.

**काका :** (आनंदानें) काय सिगारेट? द्या लवकर. तेवढ्यासाठीं तर मघां-पासून माझा प्राण कंठाशीं आला आहे.

[घोडके त्यांना सिगारेट देतो आणि स्वतःच्या तोंडांत घालतो. काडी ओढून काकांची सिगारेट पेटविणार तोंच आंतून मावशी 'प्रभात-अग प्रभात' असें ओरडत बाहेर येते. त्याबरोबर काका आपल्या तोंडांतली सिगारेट हातांत घेतात. घोडके आपली सिगारेट पेटवतो.

**काका :** (हातांतल्या सिगारेटचें कौतुक करीत) वा. फारच सुंदर सिगारेट आहे ही!

**मावशी :** (रागानें) पुन्हां तुमच्या हातांत सिगारेट?

**काका :** पण मी ओढतोंय् का? नुसती हातांत धरली आहे. हे मला दाखवीत होते हा सिगारेटचा नवीन नमुना. तेव्हां मीं म्हटलं, आतां लढाई संपल्यावर हिंदुस्थानांत नवीन उद्योगधंदे निघणार आहेत. त्यामध्यें अशातऱ्हेच्या सिगारेट तयार करण्याचे कारखाने निघणं अत्यंत जरूर आहे. त्याखेरीज हिंदुस्थानला

स्वातंत्र्य मिळणार नाहीं. (सिगारेटचा वास घेत) वाहवा, काय सुंदर वास आहे या सिगारेटचा!

**मावशी** : (त्यांच्या हातांतील सिगारेट घेऊन फेंकून देते.) वास पाहिजे काय तुम्हांला या सिगारेटीचा! मी मेले म्हणजे किनई मला सिगारेटींचं सरण करून त्यांत जाळा अन् मग जन्मभर वास घेत बसा त्या सिगारेटींचा! चला, चालते व्हा! अन् तुळशीवृंदावनाशेजारीं बसून गीतेचा आठवा अध्याय वाचा. जा.

**काका** : (जातां जातां तोंडावर मनगट मारल्याचा आविर्भाव करीत) "शंखान् दध्मुः पृथक् पृथक् "

**घोडके** : चला लौकर मावशी. प्रभातदेवी कुठं आहे? सिनेमा सुरू व्हायला आतां दहा मिनिटंच अवकाश आहे.

**मावशी** : तुम्हीं मोटारींत जाऊन बसा. मी आलेंच तिला घेऊन—

**घोडके** : ठीक आहे.

[ जातो.

**मावशी** : (चिडून अस्वस्थपणें) काय करावं आतां या पोरीला! प्रभात–

[ प्रभात बाहेर जाण्याचा पोशाख करून हातांत टेनिसची रॅकेट घेऊन येते.

**प्रभात** : काय मावशी?

**मावशी** : ओरडून ओरडून माझा घसा फुटला तरी तुझा पत्ता नाहीं! म्हटलं गेलीस कीं काय मागच्या फाटकामधून निघून. चल लौकर. बाहेर घोडके मोटार घेऊन आलेत! आपल्याला सिनेमाला जायचंय ना?

**प्रभात** : सिनेमाला? मी तर टेनिस खेळायला क्लबमध्यें निघालें!

**मावशी** : काय म्हणलीस? टेनिस खेळायला! टेनिस खेळायला म्हणजे त्या चांडाळ.का चंडोल कवीला भेटायलाच ना? मला ठाऊक आहे तुझं टेनिस खेळणं म्हणजे काय आहे तें! तो भिकारडा कवि भेटल्यापासून तुझ्या या टेनिस खेळण्याला भारीच ऊत आला आहे अलिकडे संध्याकाळचा! मी नाहीं जाऊं देणार तुला क्लबमध्यें.

**प्रभात** : असं काय करतेस, मावशी? माझी आज त्यांच्याशीं अपॉइन्टमेन्ट ठरली आहे.

**मावशी** : मग माझी देखील त्या घोडक्याशीं फेपरमिंट ठरलेली आहे.

**प्रभात :** नाहीं गेलें मी तर काय म्हणतील ते ?

**मावशी :** आणि मी जर नाहीं तुला घेऊन गेले सिनेमाला तर घोडके काय म्हणतील ?

**प्रभात :** काय वाटेल तें झालं तरी मी आतां सिनेमाला येणार नाहीं.

**मावशी :** आणि काय वाटेल तें झालं तरी तुला मी आतां सिनेमाला घेऊन जाणार !

**प्रभात :** तू मला अजून ओळखलं नाहींस, मावशी !

**मावशी :** आणि तूंही मला अजून ओळखलं नाहींस माझे भाचे ! वाटेल तें तुझं ऐकून घ्यायला तुझी मावशी काय तुझ्या परसांतील भाजी झालेली नाहीं अजून पत्तोर ! नाहीं माझं ऐकलंस तर डोकं फोडून इथं जीव देईन तुझ्या पुढं !

[ हातांतली बॅग डोक्यावर आपटून मोठयानें रडूं लागते

**प्रभात :** ( तिला आंवरीत ) असं ग काय करतेस मावशी ?

**मावशी :** ( रडत ) चुलींत गेली तुझी मावशी. आजपर्यन्त आम्हीं दोघांनीं तुझी काळजी वाहून वाहून हाडांचीं काडं केलीं. त्यांना म्हातारपण आलं अन् माझी ही अशी स्थिति झाली. आतां कांहीं आम्हीं फार दिवस जगत नाहीं बरं. आम्ही मेल्यावर मग खुशाल कर वाटेल तीं थेरं. कवि आण नाहीं तर कोणी न्हावी आण !

[ मोठ्यामोठ्यानें हुंदके देऊं लागते.

**प्रभात :** भलतंच काय बोलतेस, मावशी ! असं नको करूंस. आजच्या दिवस मला जाऊं दे.

**मावशी :** ( उसळून ) आजच्या दिवस ? आजच्या दिवस मी रहातें आहे कशाला या घरांत ! चाललें ही ! ( काकांना हांका मारीत ) अहो–अहो, ऐकलंत कां म्हटलं ?

**काका :** ( हातांत पुस्तक घेऊन प्रवेश करतात. ) काय–झालं काय ?

**मावशी :** आपल्याला ह्या घरांत आज पाणी घ्यायचं नाहीं. हिच्या आईबापाच्या शब्दासाठीं आजपर्यंत आपण जें हिचं केलं तें सगळ मातीला मिळालं. हिचा बंगला, हिचा पैसा, हिचे दागदागिने, हिचीं शेतंपोतं जें काय म्हणून

हिचं असेल तें आत्तांच्या आत्तां हिच्या स्वाधीन करा आणि त्याची पावती घेऊन बाहेर पडा आधीं इथून! चला आटपा, बांधा सामान, बघतां काय?

**काका :** पण जायचं कुठं?

**मावशी :** (रागानें) जायचं मसणांत!

**काका :** मग मसणांत जायला सामान कशाला बांधायला पाहिजे?

**प्रभात :** मी पायां पडते मावशी तुझ्या! तूं जाऊं नकोस. तूं सांगशील तसं मी ऐकतें.

[ बाहेर मोटारचें हॉर्न वाजतें.

**मावशी :** (डोळे पुशीत आनंदानें) आले-आले-(तिच्या हातांतली रॅकेट घेऊन तिला कुरवाळीत) गुणाची माझी बाळ ती. पूस डोळे. रडायला काय झालं? (काकांना) चाललांत कुठं? इकडे या! ही ब्याट ठेवून द्या हिची आंत! (त्यांच्या हातांवर रॅकेट आदळते, त्यामुळें त्यांच्या हातांतलें पुस्तक खालीं पडतें; तें उचलून) गीता वाचीत बसायला तुम्हाला सांगितलं तर ही त्या फडक्याची कादंबरी वाचीत बसलांत होय? (पुस्तक फेंकून देतें. प्रभातला) हं, चल, तूं हो पुढं. ते केस नीट आंवर! (प्रभात जाते. पुन्हां मागें वळून) काय विसरलें बरं मी? (पुन्हां हॉर्न वाजतें) आलें-आलें-(काकांना) आम्ही सिनेमाला जातों तोंपर्यंत गीता वाचीत घरांत बसा बरं का? हलूं नका.

**काका :** आम्हांला सिनेमाला यावंसं वाटत नाहीं वाटतं!

**मावशी :** डोळ्याच्या खाचा झाल्यांत—आतां सिनेमा कसला बघतांय? गीता वाचा-गीता वाचा—

[ घाईघाईनें निघून जातें. काका तिच्याकडे पहात तसेच उभे राहतात.

**काका :** कमाल आहे हिची! मसणांत जायला निघाली आणि सिनेमाला निघून गेली!-म्हटलंच आहे भगवंतांनीं कीं "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत!-राजद्वारे स्मशाने च यः तिष्ठति स बांधवः।"

[ असें पुटपुटत थोड्या वेळापूर्वी मावशीनें फेंकून दिलेली सिगारेट शोधून काढतात. ती साफसूफ करून तोंडांत घालतात आणि पेटवून दोन जोराचे झुरके घेतात, तोंच चंडोल येतो.

**चंडोल :** *प्रभातदेवी आहेत ना घरांत, काकासाहेब!*

**काका :** ( घाबरून 'सिगारेट' मागें लपवतात. पण चंडोल आहे हें पाहतांच आनंदानें ) कोण–चंडोल ? अरे वा, या–या–या !

**चंडोल :** प्रभातदेवी आहेत घरांत ?

**काका :** ती आणि आमची ही त्या बोडख्याबरोबर आत्तांच सिनेमाला गेली.

**चंडोल :** काय म्हणतां ? म्हणजे आतां इथून जी मोटार गेली—

**काका :** होय, तीच ती बोडख्याची मोटार ! त्यांत बसून तीं सारीं गेलीं.

**चंडोल :** पण प्रभातदेवींनीं तर मला आज क्लबवर भेटायचं वचन दिलं होतं. इतका वेळ मी तिथं त्यांची वाट पहात बसलों होतों ! शेवटीं कंटाळून मी इथं आलों ! ( रागानें ) मला कल्पना नव्हती—( एकदम थांबून ) बरं, जातों मी—

**काका :** अहो, चाललांत कुठं ? चहबिहा तर घेऊन जाल ! ( चंडोल न बोलतां निघून जातो. ) अहो कवी, थांबा कीं ! अरेच्या, गेला कीं हा ! अगदींच वेडा कवि दिसतोय् ! तरी बरं अजून बिचाऱ्याचं लग्न झालेलं नाहीं !

[ सिगारेट फुंकत आंत जातो.

# [ ३ ]

मागील प्रवेशानंतर सात दिवसांनीं. चंडोलच्या खोलीसमोरची चाळीची गॅलरी. एका बाजूनें पोष्टमन येतो. त्याच्या समोरून चंडोल येतो. चंडोलच्या अंगावरून पोष्टमन जाऊं लागतो. तसा चंडोल त्याचा दंड पकडतो.

**चंडोल :** ए, चाललास कुठं ? पत्र टाक माझं—

**पोष्टमन :** पत्र ! कसलं पत्र ?

**चंडोल :** माझं पत्र ! मी त्या पलिकडच्या खोलींत रहातों. चंडोल भारद्वाज राजहंस–माझं नांव !

**पोष्टमन :** पत्र नाहीं तुमचं !

**चंडोल :** नाहीं कसं ? बघूं दे मला तुझी बॅग !

**पोष्टमन :** असं काय करतां रावसाहेब ? तुमचं पत्र ठेवून मला काय करायचंय् ?

**चंडोल :** पण माझं पत्र नाहीं असं होईल कसं ? त्या दिवशीं त्या हलकट माणसा-बरोबर ती सिनेमाला गेली तेव्हांपासून आतांपर्यंत मीं तोंड पाहिलं नाहीं तिचं !

एक आठवडा झाला त्याला. तेवढ्यांत पांच पत्रं लिहिलीं मीं तिला! माझ्या एका पत्राचं तिनं अजून उत्तर पाठविलं नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे?

**पोष्टमन** : पण हें सारं मला सांगून काय फायदा? तुमची ती कोण असेल तिला तुम्हीच स्वतः जाऊन विचारा कीं! मला कशाला अडवतां?

**चंडोल** : तिच्या घरीं जाऊन तिला तर मी तें विचारणारच आहें. पण त्याच्या आधीं तुला मी त्याचा जाब विचारतों. मला ठाऊक आहे, तूं माझं पत्र कां देत नाहींस तें. मागल्या दिवाळीची मीं तुला पोस्त दिली नाहीं म्हणून तूं हा माझ्यावर सूड घेतो आहेस, नाहीं का?

**पोष्टमन** : ( छे छे, ) भलतंच काय साहेब?

**चंडोल** : इतक्या लोकांना रोज पत्रं येताहेत अन् मला नाहीं म्हणजे काय? लुच्चे आहांत तुम्ही पोष्टमन् लोक! तुम्हांला दुसऱ्यांचीं पत्रं द्यायला नकोत! आमच्यासारख्या गरीब माणसांचा तुम्हांला छळ करायला पाहिजे! प्रेमांत पडलेल्या माणसांना त्यांचीं पत्रं मिळालीं नाहींत म्हणजे त्यांच्या काळजांत आगीचा केवढा भडका उडतो याची कल्पना आहे का तुम्हांला? ( पोष्टमन हंसतो. ) हंसतोस काय दांत काढून? चल चालता हो! नालायक आहांत तुम्ही पोष्टमन लोक! तुम्हांला पगारवाढ हवी होय रे! अं? अन् तुम्हांला संपावर जायला पाहिजे नाहीं का?

[ पोष्टमन हंसत हंसत निघून जातो. इतक्यांत चंदू धांवत धांवत येते.

**चंदू** : मामा, हें चित्र बघ—

**चंडोल** : पत्र? कुठं आहे पत्र?

**चंदू** : पत्र नाहीं चित्र!

[ चित्र दाखवते.

**चंडोल** : फेकून दे तें चित्र. मला चित्र नको आहे. मला पत्र पाहिजे आहे!

**चंदू** : असं काय रे करतोस मामा वेड्यासारखं?

**चंडोल** : पांच पत्रं लिहिलीं मीं तिला आतांपर्यंत. एका पत्राचं तरी तिनं उत्तर द्यावयाला पाहिजे होतं कीं नाहीं? माझ्या भावनेची तिला पर्वा नाहीं. माझ्या प्रेमाची तिला किंमत नाहीं. शेक्सपीअर म्हणतों तेंच खरं—स्त्रीजात तेवढी हरामखोर!

**चंदू :** स्वतःशींच काय रे बडबडतोस एकसारखं ? माझ्याशीं बोल ना. ए मामीटल्या, बोलतोस का नाहीं ? का ओढूं तुझे केस ?

**चंडोल :** माणसांच्या गुणांची बायकांना परवा नसते. त्यांना नुसता पैसा पाहिजे असतो. पैशांसाठीं त्या काय वाटेल तें करावयास तयार होतात, हेंच खरं !

**चंदू :** ( मोठ्यानें ओरडून ) ए मामिटल्या-खापिटल्या, असं काय रे करतोस तूं ? बघ ना माझ्याकडं !

**चंडोल :** ( तिच्याकडे रोखल्या नजरेनें पहात ) तुझ्याकडे बघूनच मी बोलतोंय् ! चंदू, तुम्ही बायका किनई फार वाईट असतां. तुम्हाला काळीज नसतं. तुम्ही पुरुषांना झुलवतां-भुलवतां-गोड गोड बोलून त्यांना लळा लावतां-अन् शेवटीं त्यांचा केसानं सपशेल गळा कांपतां ! ( चंदू घाबरते आणि पळून जाऊं लागते, तोंच तिचा हात पकडून ) चंदू, मी काय म्हणतों तें लक्षांत आलं ना तुझ्या ? तूं पुढं मोठी होणार आहेस म्हणून तुला बजावून सांगतों. काय वाटेल तें कर पण कोणत्याही पुरुषावर खोटं प्रेम करूं नकोस आणि त्याचा विश्वासघात करून त्याच्या आयुष्याचा नाश करूं नकोस ! ( चंदू किंचाळून पळून जाते. चंडोलचें हृदय गदगदून येतें. तो क्षणभर आपलें तोंड झाकून घेतो. ) नाहीं, प्रेम हें अमृत नाहीं ! विष आहे विष !

प्रेम हें वंचिता । मोह ना मज जीवनाचा !
द्या कुणी आणुनी । द्या मला प्याला विषाचा !
प्रीतिचा फसवा पसारा,
भरली इथें नुसतीं भुतें,
कोणि नाहीं जगीं कुणाचा !

[ गाणें संपायच्या सुमारास नीरा येते. तिच्या मागून घाबरलेल्या मुद्रेनें चंदू डोकावून पहात असते.

**नीरा :** ( गाणें संपतांच ) हें आज सकाळपासून तुम्हीं काय आरंभलं आहे ?

जेवण नाहीं, खाण नाहीं. गांवभर भटकत काय फिरतां ? अन् स्वतःशींच बडबड काय करतां ! चला घरांत, दोन घांस खा आणि जरा झोपा पाहूं मुकाट्यानं !

[ नीरा त्याच्या दंडाला धरून त्याला आंत नेते.

# [ ४ ]

गांवामधला एक रस्ता. संपादक चतुर्भुज एका बाजूनें वर्तमानपत्र वाचीत येतो. दुसऱ्या बाजूनें घोडके स्वतःशींच गुणगुणत घाइघाईनें प्रवेश करतो.

**घोडके** : "यमुनाजळीं खेळूं खेळ कन्हय्या कां लाजतां ?" ( चतुर्भुजला बघून ) अरेच्या, संपादक, वर्तमानपत्र वाचीत भर रस्त्यावर काय उभे राहिलांत तुम्ही असे भ्रमिष्टासारखे ?

**चतुर्भुज** : बरे भेटलांत. तुमच्या-आमच्यासारख्या अविवाहित माणसांना अत्यंत आनंदाची बातमी. ही बघा. एक बायको जिवंत असतांना दुसरी बायको करणें हा गुन्हा आहे, असा कायदा कॉंग्रेस सरकार लौकरच या प्रांतांत पास करणार आहे !

**घोडके** : ( एकदम चेहरा पडल्यासारखा करून चतुर्भुजच्या हातून वर्तमानपत्र हिसकावून घेतो आणि वाचतो.) काय विक्षिप्त आहेत हे लोक ! एखाद्या पुरुषानं एक सोडून दहा लग्नं केलीं म्हणून यांच्या बापाचं काय जातं ! हा ज्याच्या त्याच्या ऐपतीचा आणि ताकदीचा प्रश्न आहे ! आज मी जर असेंब्लीमधें निवडून आलों असतों तर हिंदुधर्माच्या वतीनें या कायद्याला मीं भयंकर ऑप्रेकेशन केला असतां ! अन् काय हो, हा कायदा पास होणार म्हणून तुम्हांला कां आनंद झाला आहे एवढा ? तुमचा तर कशालाच कांहीं पत्ता नाहीं !

**चतुर्भुज** : म्हणूनच तर मला आनंद होत आहे. तुमच्या लक्ष्यांत आलं नाहीं या कायद्याचं महत्त्व ! अहो, हा कायदा पास झाला तर आमच्यासारख्या ब्रह्मचारी पुरुषांवर फार मोठे उपकार होणार आहेत ! एक पुरुष दोन दोन चार चार लग्नं करतो म्हणूनच तर हिंदु समाजांत बायकांचा तुटवडा पडतो आणि आमच्यासारखे ब्रह्मचारी लोक जन्मभर कोरडे ठणठणीत रहातात. आतां हा कायदा पास झाल्यावर सौभाग्यकांक्षिणी पोरी झक मारीत आमच्या पायांवर लोटांगणं घालीत येतील समजलांत, आहांत कुठं ?

**घोडके :** आतां लक्ष्यांत आलं. एकंदरींत कॅंग्रेसमधल्या ब्रह्मचारी दाढीवाल्यांनीं स्वतःच्या फायद्यासाठीं हा कायदा पास करवून घेण्याचा डाव रचलेला दिसतो आहे! चला, हा कायदा अमलांत यायच्या आधीं आपण जमतील तेवढीं लग्नं झटकन् करून घेतलीं पाहिजेत !

[ जाऊं लागतो.

**चतुर्भुज :** ( त्याला अडवून ) अहो, चाललांत कुठं ? गेले आठ दिवस मी तुम्हांला भेटायचा प्रयत्न करतों आहे, तुमचा पत्ता आहे कुठं ? काल दोनदां मी तुमच्या कचेरींत येऊन गेलों.

**घोडके :** काल आम्ही रेसला गेलों होतों !

**चतुर्भुज :** म्हणजे रेसला देखील तुम्ही जातां वाटतं ?

**घोडके :** आम्ही रेसला जाणार नाहीं तर काय तुम्ही जाणार ? अहो ! रेस, सट्टा, जुगार, आंकडे, पत्ते हा आम्हां पैसेवाल्या श्रीमंतांचा रोजचा खेळ आहे. काल पांच मिनिटांत एका घोड्यावर मीं पांच हजार रुपये मिळविले. फाइव्ह थावजंड ! प्रभातदेवी अन् मावशी तर नुसत्या चाट पडल्या !

**चतुर्भुज :** म्हणजे त्या आल्या होत्या कीं काय तुमच्याबरोबर रेसला ?

**घोडके :** श्रीमंत लोक रेसला कधीं एकटे जात नसतात. त्यांच्या बरोबर कुणी तरी फक्कडशीं माणसं हीं आपलीं असलींच पाहिजेत. चतुर्भुज, अगदींच कसे हो तुम्ही ' हे ' ?

**चतुर्भुज :** आतां आम्हांला हो काय माहीत ?

**घोडके :** बाकी हे सगळे तुमचेच उपकार म्हटले पाहिजेत. तुम्हीं आमची प्रभातदेवीशीं ओळख करून दिल्यापासून आमच्या नशिबानं अगदीं ताळच सोडला आहे. रोज आम्ही मोटारींतून काय हिंडतोंय्, सिनेमा काय बघतोंय्, हॉटेलांत काय खातोंय्, रेसला काय जातोंय् ! कांहीं विचारूं नका.

**चतुर्भुज :** नशिबवान् आहांत !

**घोडके :** अरे, कुंडलींतले ग्रह माशासारखे असे माझ्या बुटावर घोंघावताहेत ! मला भय असं वाटतं तें हें कीं, हे लेकाचे ग्रह मला असे चढवीत चढवीत नेणार तरी वर कुठपर्यंत ? उद्यां देशाला स्वातंत्र्यबितंत्र मिळालं तर एखादे वेळीं चटकन् मी या मुंबई इलाख्याचा गव्हर्नर देखील होऊन जायचा !

**चतुर्भुज** : मग आम्हांला पार्टी केव्हां देणार ?

**घोडके** : अरे, एक पार्टी काय घेऊन बसला आहांत! आमचं जमूं द्या जरासं. म्हणजे रोज पार्ट्या न् मेजवान्या देईन तुम्हाला. हा घोडके म्हणजे काय तुम्ही सामन्य असामी समजलांत होय ?

**चतुर्भुज** : म्हणजे–अजून जमलं नाहीं वाटतं !

**घोडके** : जमतंय्–जमतंय्–थोडं धीरानं तर घ्याल !

**चतुर्भुज** : छे, छे, आपल्याला आतां बिलकूल धीर नाहीं! पण मी म्हणतों, आतां अडलंय कुठं ?

**घोडके** : कांहीं अडलं नाहीं, सगळं जमत आलं आहे. अगदीं थोडं राहिलंय्! म्हणजे जवळजवळ ध होल एलेफंट इझ गान्, धिस मच् इझ रिमेन्ड !

**चतुर्भुज** : ( त्याची पाठ थोपटीत ) शाबास, शाबास, बहाद्दूर आहांत !

**घोडके** : दोनच दिवस आतां कळ काढा! मग असा भडका उडवून देतों सान्या वर्तमानपत्रांत कीं देखते रहो ! फोटो काय न् चरित्रं काय! सान्या महाराष्ट्राला चांगला हबकाच बसला पाहिजे.

**चतुर्भुज** : आमच्या 'अर्धांगी' मासिकाचा तर खास अंकच काढीन मी! चला, आमच्या हातून आमचं कार्य झालं नाहीं तरी निदान तुमचं तरी होऊं द्या!

**घोडके** : जातों मी! संध्याकाळीं हिराबाईच्या जलशाला जायचंय आज आम्हांला. तेवढ्यासाठीं शालू घेऊन द्यायचाय ना तिला पांचशें रुपयांचा! अन् मावशीसाठीं तीनशें रुपयांचा.

**चतुर्भुज** : ( भीत भीत ) मला दोनशें रुपयांची गरज होती. कागद घ्यायचा होता मासिकासाठीं.

**घोडके** : लाजूं नका–लाजूं नका ! काय मागायचें तें मागून घ्या या वेळीं! वाहत्या गंगेंत हात धुऊन घ्या वाटेल तितका ! पुन्हां अशी वेळ यायची नाहीं! ( खिशांतून पैसे काढून पहात ) दोनशें कांहीं नाहींत. पण हे वीस रुपये ठेवून घ्या सध्यां. वरचं राहिलेलं शून्य देईन उद्यां परवां. ( पूर्वीप्रमाणें गात गात जातो. ) "हलती कशा या लाटा ! फुलतो शरीरीं काटा ! बाई काटा !"

[ समोरून चंडोल येतो. 'बाई काटा' म्हणतांना त्याला जोरानें कोपराचा धक्का देतो आणि निघून जातो. चंडोल त्याच्याकडे वळून पहातच उभा राहतो.

**चंडोल :** काय झालंय् काय या पापडवाल्याला आज ? भलताच जोरांत दिसतोय् हा !

**चतुर्भुज :** कां असूं नये त्यांनीं जोरांत ?

**चंडोल :** म्हणजे, विशेष काय त्याच्या आयुष्यांत असं घडलंय् ? पापडाचा भाव वाढलाय्, का लोणच्याला तेजी आली आहे ?

**चतुर्भुज :** अहो, पापड-लोणचीं घेऊन काय बसला आहांत कविराज, अमृताचा अख्खा रांजणच्या रांजण घशामध्यें उतरणारसा दिसतो आहे स्वारीच्या ! आ वासून काय बघतांय् माझ्याकडे ?

**चंडोल :** म्हणतांय काय तुम्ही ?

**चतुर्भुज :** तुम्ही नुसते बायकांच्या चेहऱ्याकडे बघा, अन् जन्मभर कविता खरडीत बसा कागदांवर. आयुष्यांतली खरी मजा हे आपले पापडवाले अन् मसालेवालेच करून जातात. तुम्ही आम्ही आपले असेच बसतों बाहेर ठणाणा करीत.

**चंडोल :** आतां बोलतोस कीं नाहीं ? कां दाबूं तुझा गळा—

**चतुर्भुज :** ( हलक्या आवाजांत ) त्या प्रभातचं न् याचं जमलं कीं !

**चंडोल :** ( ओरडून ) जमलं ! काय जमलं ?

**चतुर्भुज :** लग्न ! दुसरं काय ?

**चंडोल :** खोटं, साफ खोटं ! शक्य नाहीं ! कालत्रयीं शक्य नाहीं !

**चतुर्भुज :** शक्य काय नाहीं ? हल्लींच्या काळांत वाटेल त्याचं जमणं शक्य आहे. इंग्लंडचं न् रशियाचं नाहीं जमलं ? मुस्लीम लीगचं अन् शे. का. फे. चं नाहीं जमलं ? मग यांचं हें जमणं एवढं मोठंसं काय कठीण आहे ?

**चंडोल :** डॅबीस आहे तो ! आत्तांच्या आतां जाऊन त्याचा खूनच करतों !

[ जाऊं लागतो.

**चतुर्भुज :** ( त्याला अडवीत ) ए, चाललास कुठं ? त्याचं लग्न ठरलं म्हणून तुला खून चढायचं काय कारण ?

**चंडोल :** एका सत्वशील आणि सुशिक्षित मुलीची बदनामी करतो आहे–हरामखोर !

**चतुर्भुज :** त्यांत बदनामी कसली आली ? तो येऊन जाऊन लग्नच लावणार आहे ना तिच्याशीं ?

**चंडोल :** नाहीं–हें लग्न होणं शक्य नाहीं !

**चतुर्भुज :** पण मी म्हणतों त्यांत अशक्य असं काय आहे ? तो श्रीमंत आहे; ती श्रीमंत आहे. तो अविवाहित आहे ; ती अविवाहित आहे. त्याला लग्न करायचंय, तिला लग्न करायचंय. मग मी म्हणतों, दोघांचं लग्न कां होऊं नये ?

**चंडोल :** मी होऊन देणार नाहीं हें लग्न !

**चतुर्भुज :** अरे, वा रे वा ! हा अगदीं जुल्म आहे. लग्न करणार तो आणि ती ! आणि त्यांना अडवणारा तूं रे कोण लेका तिऱ्हाईत टिकोजी ?

**चंडोल :** तुला कल्पना नाहीं त्या मुलीची. विलक्षण ध्येयवादी आणि महत्त्वाकांक्षी आहे ती. ती असल्या लोणचेवाल्याशीं लग्न लावील होय ? बायकांचं मासिक चालवितां तुम्ही चतुर्भुज, पण बायकांचं अंतःकरण कांहीं तुम्हांला कळलं नाहीं अजून !

**चतुर्भुज :** कळलं असतं तर असा कां राहिलों असतों मी सडाफटिंग ? बाकी तूं कांहींही म्हणालास किनई कवि, तरी आपल्याला जें डोळ्याला दिसतं तें आपण आपलं खरं मानतों ! जी मुलगी चोवीस तास त्या माणसाबरोबर मोटारींतून हिंडते—

**चंडोल :** झूट !

**चतुर्भुज :** हॉटेलांत जाते–रेसला जाते—

**चंडोल :** एकदम झूट !

**चतुर्भुज :** अस्सं ? मग तुला पुरावाच पाहिजे असेल तर आज रात्रीं हिराबाईचा जलसा आहे, तिथं जाऊन तूं आपल्या डोळ्यांनींच प्रत्यक्ष बघ. म्हणजे दिसतील तुला ते दोघे मांडीला मांडी लावून एकत्र बसलेले. हें बघ, असं डोकं फिरवून घेऊं नकोस. शांतपणें विचार कर.

**चंडोल :** कुणीं सांगितलं तुला हें ?

**चतुर्भुज :** आतां त्यांनीं स्वतःच सांगितलं कीं आपल्या तोंडानं. तो काय,

पांचशें रुपयांचा शालू आणायला गेला आहे तो आतां तिच्यासाठीं—त्या मारवाड्याच्या दुकानांतून.

**चंडोल** : ( क्षणभर विचारांत पडतो. ) कांहीं तरी गफलत दिसते आहे ही ! बहुतेक त्या मावशीचंच हें कारस्थान असावं. तरीच तिला माझ्या एकाही पत्राचा जबाब देतां आला नसावा. तें कांहीं नाहीं, अस्साच्या असा जातों तिच्या घरीं आणि त्या पुतनामावशीच्या झिंज्याच पकडतों ! एका गरीब निष्पाप मुलीचा गळा कापते काय ?

[ जाऊं लागतो.

**चतुर्भुज** : अरे, पण तुझा काय संबंध ?

**चंडोल** : कळेल माझा काय संबंध आहे तो !

[ वेगानें निघून जातो.

**चतुर्भुज** : या कवी लोकांचा कुठं काय संबंध निघेल ?

[ पुटपुटत निघून जातो.

## [ ५ ]

प्रभातचा दिवाणखाना. व्यथित मनानें ती कोचावर गात पडलेली आहे. तिच्या हातांत चंडोलचा फोटो आहे. गातां गातां तिचे डोळे अश्रूंनीं भरून येतात, आणि ते गालावरून वाहूं लागतात.

प्रीती सुरी । दुधारी !
निशिदिनिं सलते जिव्हारीं !
सुखवी जिवास भारी !
मधुर सुखाच्या यातना,
व्याकुळ करिती सतत मनाला !
अमृताहुनी विषारी !

[ गाणें संपतांच 'प्रभात' अशी आंतून मावशीची हांक येते. तशी प्रभात चटकन् उठते, आणि चंद्रोलचा फोटो एका पुस्तकांत घालून ठेवते; आणि डोळे पुसून केस सावरते. हातांत एक भरजरी शालू घेऊन मावशी हंसत हंसत प्रवेश करते. तिनें स्वतः एक नवा झगझगीत शालू नेसलेला आहे.

**मावशी** : ( स्वतःच्याच तोऱ्यांत ) किती सुंदर आहे हा शालू! ( प्रभातकडे बघून ) झोपली होतीस वाटतं ? ( प्रभात बोलत नाहीं. शालू तिच्यापुढें करून ) बघ–बघ हा शालू.

**प्रभात** : ( पाहिला न पाहिल्यासारखें करून थंड स्वरांत ) ठीक आहे.

**मावशी** : ठीक आहे काय ? असा शालू पहायला मिळायचा नाहीं ! म्हणे ठीक आहे ! पांचशें रुपयांचा आहे ! अन् हा माझा चांगला चारशें रुपयांचा आहे ! इंदूरच्या हुकूमशेटनीं घोडक्यांना म्हणे हे नजरभेट दिले. ते त्यांनीं आपल्याला पाठवून दिले. असा काय चेहेरा करून बसलीस ? आज आपल्याला हिराबाईच्या गाण्याला जायचं आहे ना ?

**प्रभात** : ( निश्चयी स्वरांत ) मावशी, माझं थोडं ऐकतेस का ?

**मावशी** : ( कपाळाला आठ्या घालीत ) हें काय काढलंयस आज नवीन !

**प्रभात** : तुझ्या म्हणण्याप्रमाणें आतांपर्यंत मी सगळं करीत आलें. त्या माणसा-बरोबर सिनेमाला गेलें, फिरायला गेलें, रेसला गेलें—

**मावशी** : मग बिघडलं काय त्याच्यांत ?

**प्रभात** : आतां मला नको सांगूस त्याच्याबरोबर जायला. नाहीं सहन होत मला या यातना !

**मावशी** : बघूं दे–बघूं दे मला–कुठं दुःखाचीं गळवं उठलींत माझ्या पोरीच्या शरीरावर तें ?

**प्रभात** : ( चिडून ) थट्टा वाटते तुला ?

**मावशी** : थट्टा कशानं ? अगदीं खरं वाटतं मला तूं काय म्हणतेस तें ! सुख फार झालं म्हणजे तें देखील दुखतं म्हणतात ना, तें कांहीं खोटं नाहीं. आतां संध्याकाळीं त्यांच्याबरोबर जलशाला जाऊन बसलीस कीं नाहीं म्हणजे एकदम बरं वाटेल माझ्या सोनुलीला. पाहूं दे हा शालू कसा शोभतोय आमच्या लक्ष्मीला तें ?

**प्रभात** : ( रडकुंडीला येऊन ) कां विनाकारण आतां माझा अंत पहातेस मावशी ?

मला कांहीं एक नको त्या माणसाचं! त्याचं तोंड देखील पहाण्याची इच्छा नाहीं मला!

**मावशी** : ( उसळून ) मग आजपर्यंत इतके पैसे खर्च केले त्यांनीं तुझ्यासाठीं–शेंकडो रुपयांच्या तुला देणग्या दिल्या–तुझ्या मनांत नव्हतं तर कां त्याला आशा दाखविलीस विनाकारण ?

**प्रभात** : त्यानं दिलेल्या जिनसांपैकीं एकाही जिनसेला मीं कधीं हात लावला नाहीं हें माहीत आहे तुला. ढुंकून मीं कधीं त्याच्याकडे पाहिलें नाहीं कीं त्याच्याशीं एक अक्षर बोललें नाहीं! मीं दाखविली त्याला आशा ? तूं दाखविली असशील त्याला आशा!

**मावशी** : हो, मीं दाखविली त्याला आशा! समज, मीं दाखविली त्याला आशा! म्हणून तूं मला आतां खोट्यांत पाडून माझी फजिती करणार होय त्याच्यासमोर ?

**प्रभात** : ( उपरोधानें ) मग तुझा मान राखण्यासाठीं मी त्या माणसाशीं लग्न करूं म्हणतेस होय ?

**मावशी** : मावशीचा मान राखण्यासाठीं एवढं केलंस तर कांहीं नरकांत जायची नाहींस बरं का! वडिलांचा मान राखण्यासाठीं तरुणांनीं आपले प्राण दिले आहेत पुराणांत!

**प्रभात** : पुराणांतलीं वांगीं पुराणांतच छान शोभतात. तो काळ आतां गेला. आतां तरुणांच्या सुखासाठीं मोठ्यांनीं आपल्या प्राणांच्या आहुति देण्याचा काळ आला आहे बरं का मावशी!

**मावशी** : तर–तर–तरुणांच्या सुखासाठीं मोठे प्राण द्यायला बसलेत! उचलली जीभ अन् आपली लावली टाळ्याला! मी नाहीं कुणासाठीं माझा प्राण द्यायची! पण मी म्हणतें, आयुष्यांत तुला कोणाशीं तरी लग्न करावं लागणारच आहे कीं नाहीं ? मग ह्या माणसाशीं लग्न केलंस म्हणून काय बिघडलं ? तो काय आंधळा आहे, डुचका आहे, कां लंगडा आहे ? एवढा गडगंज पैसा भरला आहे त्याच्याजवळ. त्याला कांहीं कमी का आहे कोणत्या गोष्टीमध्यें ?

**प्रभात** : पैशाचा अन् लग्नाचा कांहीं एक संबंध नाहीं! लग्न करायला थोडासा पैसा लागतो, म्हणून केवळ पैशासाठीं का कोणी लग्न करतं ?

**मावशी** : मग लग्न करायला लागतं तरी काय ?

**प्रभात :** एकमेकांवर निःस्वार्थी प्रेम करणाऱ्या दोन स्त्री-पुरुषांशिवाय लग्नाला कांहीं एक लागत नाहीं दुसरं! भिक्षुक लागत नाहींत—वाजंत्री लागत नाहींत—पाहुणे लागत नाहींत—जेवणं लागत नाहींत—कांहीं एक लागत नाहीं!

**मावशी :** तर तर! पहिलं कार्य आमच्या घरांतलं—असं मडमेसारखं ओकं ओकं करून देईन तुला मी—म्हणे पाहुणे लागत नाहींत न् जेवणें लागत नाहींत—अग वा ग वा!

**प्रभात :** लग्न हें दोन अंतःकरणांमधें लागतं! शरीरामधें नाहीं, मावशी!

**मावशी :** तर तर—मोठी आली आहे मला सांगायला! म्हणे लग्न हें अंःतकरणांत लागतं—शरीरांत नाहीं! अशीं अंतःकरणाचीं लग्नं लागून कां कुठं पोरंबाळं होतात आणि संसार चालतात!

**प्रभात :** लग्नाचा खरा अर्थ तुला कळणं शक्य नाहीं, मावशी!

**मावशी :** वीस वर्षं झालीं माझं लग्न होऊन. मला लग्नाचा अर्थ कळत नाहीं—अन् तुला कळतो होय? तुझ्या तर लग्नाला देखील अजून पत्ता नाहीं! (स्वर बदलून) बस कर तुझं शहाणपण. पुष्कळ ऐकलं मीं आतां! अखेर मी सांगतें त्याच्याशींच तुला लग्न लावावं लागेल!

**प्रभात :** (रागानें) असली जबरदस्ती तूं करणार असशील माझ्यावर, तर मी या घरांतून चालती होईन. मला घर नको, दार नको, ती संपत्ती नको अन् तुम्ही देखील नकोत!

**मावशी :** लहानपणीं तुझे आईबाप मेले तेव्हांपासून पोटच्या पोराप्रमाणं हाताचा पाळणा करून आम्हीं दोघांनीं तुला सांभाळलं. स्वतःच्या रक्ताचं पाणी करून आजपर्यंत तुला वाढवलं. बी. ए. होईपर्यंत तुला शिक्षण दिलं. तुझ्या घरादाराचं, शेतापोतांचं अन् पैपैशांचं संरक्षण केलं. तूं आम्हांला लाथ मारून आतां घराबाहेर जाणार आणि आमच्या तोंडाला काळोखी लावणार होय? चांगलं! एक दिवस तुझं चालायचं नाहीं आमच्यावांचून. उंबऱ्याबाहेर पाऊल पडलं नाहीं तोंच येशील परत गळा काढून—'मावशी ग!'

**प्रभात :** हीच, हीच तुझी घमेंड आहे. तुला वाटतं आपल्यावांचून कोणाचं कांहीं चालायचं नाहीं. काकांचं चालायचं नाहीं—माझं चालायचं नाहीं—एवढंच काय पण जग देखील चालायचं नाहीं!

**मावशी :** नाहींच चालायचं. माझ्यासारखी प्रेमाची मावशी मिळायला तुला दहा जन्म घ्यावे लागतील !

**प्रभात :** हें तुझं प्रेम नाहीं. दुसऱ्यावर ताबा ठेवण्याच्या हेतूनं मुद्दाम पांघरलेलं हें ढोंग आहे. मी–काकांनीं–सगळ्यांनीं दुबळं होऊन तुझ्याभोंवती 'मावशी–मावशी' म्हणून अष्टौप्रहर गोंडा घोळीत फिरावं म्हणून प्रेमाचा देखावा करतेस तूं हा. तुला वाटतं कीं मी अजून कुकुलं बाळच आहे. तुझी इच्छा ही कीं, सांजसकाळ मीं तुझ्या कडेवर बसून राहावं, तूं भरवशील तें मीं खावं अन् तूं थोपटशील तेव्हां मीं झोपावं ! खालीं उतरून मी स्वतःच्या पायावर जरा कुठं चाललें कीं, 'पडशील !' म्हणून मोठ्यानं तूं आरडाओरड केलीच म्हणून समज ! अशा रीतीनं आजपर्यंत मला पांगळी करून तुझं समाधान झालं नाहीं, म्हणूनच कीं काय तूं सांगशील त्या माणसाच्या गळ्यांत मान अडकवून मीं जन्माचं दुबळं व्हावं आणि तुझ्या गुलामगिरींत रहावं एवढ्यासाठींच तुझ्या प्रेमाचा हा तूं तमाशा चालविला आहेस ! नाहीं, मावशी, इतःपर तुझा हा जुलूम मी मुळींच चालू देणार नाहीं ! यापुढं स्वतःच्या इच्छेनं वागायचं मीं ठरवलं आहे. मी दारिद्र्य सहन करीन, हाल अपेष्टा सहन करीन, मूर्ख आणि मत्सरी जगाचा तिरस्कार सहन करीन, पण काय करायचं तें एकट्या स्वतःच्याच विचारानं करीन. तुझ्याच काय पण कोणच्याच ओंजळीनं पाणी पिण्याची माझी इच्छा नाहीं !

**मावशी :** घे–घे–जेवढं तुला बोलून घ्यायचं असेल तेवढं बोलून घे. कांहीं कमी करूं नकोस. बरी हातांत सांपडली आहे तुझ्या आज मावशी ! (हळूहळू हुंदके देते आणि डोळे पुसूं लागते. कांहीं वेळ कोणीच बोलत नाहीं.) तूं करती सवरती झालीस तर मला कांहीं त्याचं दुःख आहे का ? कर बरं, तुझ्या मानाला वाटेल तें कर ! आमच्या मताची बिलकूल परवा करूं नकोस तूं. संध्याकाळीं घोडके आले म्हणजे मी त्यांना साफ सांगते कीं, फिरून तुम्ही या घरांत पाऊल टाकीत जाऊं नका. होऊं दे त्यांच्या अंतःकरणाचे चांगले तुकडे तुकडे !

**प्रभात :** पण मी त्या माणसाशीं लग्न करायला तयार होईन असं तुला वाटलं तरी कसं ? ज्या माणसावर माझं प्रेम नाहीं, ज्या माणसाच्या नांवाचा, धंद्याचा, चेहऱ्याचा मला मनापासून तिरस्कार आहे, त्याच्याशीं लग्नाचं सोंग करून मी त्याच्या डोळ्यांत धूळ टाकूं ? दीड दमडीच्या त्याच्या दौलतीची अन् दागिन्यांची मालकीण म्हणून त्याच्या मोटारीमधून हिंडून साऱ्या जगाला फसवूं ? अन् त्याच्या मुलाबाळांची जबरदस्तीनं माता होऊन आणि संसाराचं खोटं

नाटक करून मीं काय माझ्या आयुष्याशीं विश्वासघात करूं? नाहीं—मावशी—हें शक्य नाहीं!

**मावशी :** कळलं बरं! एवढं ओरडून सांगायची कांहीं जरूरी नाहीं! तुझं त्या चडोल कवीवर प्रेम आहे अन् त्याच्याशीं तुला लग्न करायचंय हेंच तुला म्हणायचं आहे ना? मग त्याला ओरडायला कशाला पाहिजे. लाव बरं—खुशाल त्याच्याशीं लग्न लाव! असूं दे तो कितीही मेला दरिद्री असला तरी!

**प्रभात :** गरिबी हा कांहीं त्यांचा दोष नाहीं. माझ्या श्रीमंतीबद्दल जशी मी जबाबदार नाहीं तसें त्यांच्या गरिबीबद्दल तेही जबाबदार नाहींत. त्यांची इच्छा असल्यास मी त्यांना माझा पैसा देईन. नसल्यास मी माझी संपत्ति गरिबांना वांटून टाकीन आणि आजन्म त्यांच्या बरोबर दारिद्र्यांत राहीन!

**मावशी :** पण काय ग, मला तर कुणी सांगितलं कीं त्याचं एका बाईवर प्रेम आहे; आणि तिला घेऊन तो गांवभर भटकत असतो म्हणून!

**प्रभात :** त्यांच्या विरुद्ध कोणी कांहींही मला सांगितलं तरी त्याच्यावर माझा विश्वास बसायचा नाहीं!

**मावशी :** पुरुषांची मुळींच खात्री धरूं नकोस तूं, प्रभात! त्यांतून तो वयानं तरुण—चांगला पंचवीस सव्वीस वर्षांचा; आणि फिरून कवि. हल्लींच्या काळांत इतक्या वर्षांपर्यंत कोणी पुरुष रहात नाहीं तस्सा! मी तुला सांगतें.

**प्रभात :** त्यांच्यासारखा पुरुष हजारांत एक मिळायचा नाहीं, मावशी!

**मावशी :** मग एवढं जर त्याचं प्रेम आहे तुझ्यावर, तर गेल्या आठ दिवसांत एकदां तरी त्यानं इथं यावं का नाहीं? निदान, मी म्हणतें, एक बोटभर चिठ्ठी तरी पाठवावयाची! वळवाच्या पावसासारखा मधेंच सरसर काय आला अन् आतां अगदीं होता कीं नव्हता होऊन गेला. याला म्हणतात होय प्रेम?

**प्रभात :** त्या दिवशीं मीं क्लबवर भेटायचं त्यांना कबूल केलं आणि सिनेमाला निघून गेलें म्हणून ते माझ्यावर रागावले असतील. खरंच, त्या दिवशीं मीं त्यांचा फार मोठा अपराध केला. मला त्यांच्या घरीं जाऊन त्यांची क्षमाच मागायला पाहिजे.

**मावशी :** तूं नको कांहीं त्यांच्या घरीं जाऊन क्षमा मागायला! मीच उद्यां त्यांच्या घरीं जातें, त्यांच्या पाया पडतें, त्यांची क्षमा मागतें आणि काय ठरवायचं तें सगळं ठरवूनही येतें!

**प्रभात** : ( आनंदातिशयानें ) काय म्हणतेस ? खरंच–खरंच—

**मावशी** : हो–हो–अगदीं खरं ! सगळं सगळं तुझ्या मनाप्रमाणं ठरवून येतें ! कांहीं काळजी करूं नकोस बरं !

**प्रभात** : ( तिच्या कमरेला मिठी मारून ) किती किती चांगली आहेस तूं–मावशी !

**मावशी** : इतकी तुझी मावशी वाईट नाहीं बरं ! ( मोठ्यानें गळा काढून रडूं लागते. ) आजपर्यंत कधीं कधीं मी तुझ्या हिताच्या आड आलें नाहीं आणि आतांही पण येणार नाहीं. माझं म्हणणं एवढंच, कीं तुझं काय चांगलं व्हायचं असेल तें तुझ्या या मावशीच्या हातानं होऊं दे ! मिळूं दे तिला तुझं चांगलं केल्याचं एवढं तरी श्रेय !

**प्रभात** : खरंच, आतां मी कधीं तुझ्या मनाविरुद्ध वागायची नाहीं !

**मावशी** : ( डोळे पुशीत आनंदानें ) नाहीं ना ? नाहीं ना ? मग मी तुला सांगतें, आजच्या दिवस एवढं ऐक ना माझं ! नाहीं नको म्हणूस त्या जलशाला ! ( प्रभात गंभीर होते ) मीं त्यांना माझा शब्द दिला आहे. म्हणून म्हणतें ! ते मला काय म्हणतील ? पुन्हां मी कधीं कधीं आग्रह करणार नाहीं तुला. अगदीं माझ्या गळ्याशपथ ! आज तूं ऐक एवढं माझं. मग उद्यांपासून तूं सांगशील तें मी ऐकेन !

**प्रभात** : ( नाइलाजानें ) ठीक आहे. येईन मी !

**मावशी** : ( तिला कुरवाळीत ) माझी गुणाची बाळ ती ! जा, पड जाऊन आंत आपल्या बिछान्यावर. रात्रीं जाग्रण व्हायचंय्. तोंपर्यंत मी या शालूची घडी मोडते.

**प्रभात** : मला नको तो शालू ! मी माझाच नेसेन !

[ जाते. मावशी क्षणभर निस्तब्ध उभी रहाते. शेवटीं आपणच आपलें म्हणणें खरें केलें या विचारानें तिचा चेहरा प्रफुल्लित होतो. इतक्यांत प्रभात आंतून एक पत्र घेऊन येते.

**प्रभात** : माळी, ए माळी–( माळी येतो. ) हें पत्र टाकून ये—

**माळी** : जी.

[ माळी पत्र घेतो. प्रभात आंत जाते.

**मावशी :** ( हलकेच ) इकडं आण तें पत्र ! ( पत्राचा पत्ता पहाते, पत्र फोडून घाईघाईनें वाचते आणि फाडून तें माळ्याच्या हवालीं करते. ) लांब टाकून दे कुठं तरी हें ! एक चिठोरं तिच्या दृष्टीस पडतां कामा नये !

**माळी :** अन् ताईसाहेबांना आतां भेटायला आले होते ते !

**मावशी :** असं ? मग काय सांगितलंस त्याला ?

**माळी :** तुम्हीं सांगितलं तसंच ! म्हटलं—आज सकाळींच कांहीं जरूरीच्या कामासाठीं आपल्या आजोळीं निघून गेल्यात त्या. महिना पंधरा दिवस यायच्या नाहींत परत.

**मावशी :** छान सांगितलंस ! मग गेला ना तो ?

**माळी :** थांबले थोडेसे. अन् मग म्हणाले, मला मावशीबाईंना भेटायचंय. मी म्हणालों, बाई झोपल्यांत, त्यांना बरं नाहीं. तेव्हां रागारागानं ते निघून गेले.

**मावशी :** ठीक झालं. पण नीट सावध रहा अं ! नाहीं तर यायचा तो पुन्हां !

**माळी :** तुम्ही नका काळजी करूं त्याची !

[ माळी निघून जातो. काका बाहेर जायचा पोषाख करून गुणगुणत येतात.

**काका :** म्हटलं मी जरा बाहेर जाऊन येतों. एका पुनर्विवाहाला मला जायचंय.

**मावशी :** ( खेकसून ) तीन लग्नं झालीं तुमचीं, तरी दुसऱ्याच्या लग्नाला जायची हौस आहेच का अजून ? बसा घरांत. हो, अन् रात्रीं आम्हांला जलशाला जायचंय् हिराबाईच्या—बरं का ! तेव्हां म्हटलं घर नीट सांभाळा. झोपूं नका. गांवांत चोऱ्या फार होऊं लागल्यात हल्लीं. एखादे वेळीं चोरबीर यायचा या घरांत !

[ बोलत बोलत आंत निघून जाते.

**काका :** म्हणे—चोरबीर यायचा या घरांत ! जसं कांहीं चोरांना माहीतच नाहीं कीं ही बया या घरांत रहाते म्हणून ! हरे रामा, रामा, रामा ! कुठून झक मारली आणि हें तिसरं लग्न केलं !

[ हताश होऊन कोचावर बसतो. पडदा पडतो.

# ३

चंडोलच्या खोलीबाहेरची ग्यालरी. चतुर्भुज, नीरा आणि चंदू बोलत बोलत प्रवेश करतात.

**चतुर्भुज** : काय म्हणतां ?

**नीरा** : तर काय ! काल सकाळपासून चंडोलांचा घरांत पत्ता नाहीं. रात्रभर मीं त्यांचं ताट झांकून ठेवलं आणि त्यांची वाट पहात बसलें. म्हटलं आतां येतील मग येतील, चांगलं उजाडेपर्यंत मी जागी होतें. असे डोळे चुरचुरताहेत माझे जाग्रणानं !

**चतुर्भुज** : अगदींच कवि आहे झालं ! सबंध रात्रभर हा घरांत नाहीं म्हणजे गेला तरी कुठं असावा ? तशी त्याची ओळख कुणाशीं विशेष नाहीं; आणि भलतीकडं तसा तो फार वेळ बसायचाही नाहीं.

**नीरा** : तेंच तर मी म्हणतें. एक तुमच्याखेरीज गांवांत त्यांचं कुणाशीं फारसं सख्यही नाहीं. त्यांच्या फटकळ तोंडामुळं आणि लहरी स्वभावामुळं त्यांचं पटेल तर ना कोणाशीं ? अगदीं सकाळीं मी विचारायलाही येणार होतें तुमच्याकडे. म्हटलं एखादे वेळीं तुमच्या इथं झोपलीबिपली असायची स्वारी.

**चतुर्भुज** : छे, छे ! अहो, माझी ब्रह्मचाऱ्याची एवढीशी तर खोली. तिथं दुसऱ्या माणसाला झोपायला जागासुद्धां नाहीं !

**नीरा** : काल कधीं भेटले तुम्हांला ते ?

**चतुर्भुज :** मी त्या जंगल्या मारुतीच्या रस्त्यावरून येत होतों बघा. काल शनिवार ना? म्हणून मारुतीला गेलों होतों. फार चांगला आहेः मारुती तो! रात्रीं फार गर्दी होते लोकांची आणि मग तेलाची वाटी न् नारळ हातांत घेऊन त्या 'क्यू'–मधें उभं रहावं लागतं. म्हणून विचार केला कीं, जरा लौकरच दर्शन घेऊन यावं. पांच–साडेपांचाचा सुमार असेल. तेव्हां देवळांतून मी बाहेर आलों तों वाटेंतच मला तो भेटला. दहापंधरा मिनिटं बोलला चांगला माझ्याशीं नेहमींप्रमाणें; अन् भ्रमिष्टासारखा कांहीं तरी बडबडत निघून गेला!

**नीरा :** गेले पंधरा दिवस हें असंच चाललंय त्यांचं! कधीं येतात तर येतात, जेवतात तर जेवतात अन् बसले तर बसतात. कशाकडे म्हणून त्यांचं मुळी लक्ष्यच नाहीं. एकसारखं कांहीं तरी आपलं लिहीत असतात. काय डोक्यांत चाललंय त्यांच्या परमेश्वराला ठाऊक! मी म्हणतें, एवढी शरीराची नासाडी करून त्या कविता रचण्यामधें कांहीं फायदा आहे का? बाकी मला त्या कवितेंतलं काय कळतंय म्हणा!

**चतुर्भुज :** आणि मी आमच्या मासिकांत इतक्या कविता छापतों म्हणून मला त्यांतलं एक अक्षर कळतं म्हणतां काय? छे हो, नांव नाहीं. बरं तें जाऊं द्या. मग आतां त्याचं काय करायचं? आणखीन् दुसरीकडं कुठं त्याचा तपास तुम्ही केलांत?

**नीरा :** मी बोलून चालून एक अनाथ बाई. माझी कुठं ओळख ना पाळख? मी कुठं त्यांचा तपास करणार? आणि त्यांतून या पोरीनं तर असा आकांत मांडलाय! मामावांचून एक घास खायलाही ती तयार नाहीं! (चंदू रडते.) हं, आतां पुरे बरं का हें रडणं. रडून रडून डोळे अगदीं मुठीसारखे सुजवून घेतले आहेत. येईल आतां मामा–कांहीं कुठं गेला नाहीं सात समुद्र ओलांडून!

**चतुर्भुज :** नाहीं तर पोलीस चौकीवर जाऊन वर्दी देऊन येऊं का! कीं असा असा आमचा कवि गहाळ झाला आहे म्हणून?

**नीरा :** मला काय त्यांतलं कळतंय? तुम्हीच बघा.

**चतर्भुज :** हो, आपलं कायद्याप्रमाणें वागलेलं बरं. जातों मी. (जायला वळतो तोंच त्या बाजूनें मावशी येतात.) अरे, मावशी! तुम्ही इथं कुणीकडे!

**मावशी :** मी त्या तुमच्या चंडोल कवीकडे आलें होतें. ते इथंच रहातात ना कुठं?

**प्रभात** : ( आंतून वेगानें येते आणि काकांच्या गळयास मिठी मारते ) काका—

**काका** : ( त्वेषानें ) हात लावूं नकोस माझ्या अंगाला ! जा—लग्न कर त्या खेचराशीं अन् त्याच्या पाठीवरच्या पैशाच्या गोण्याशीं—आणि मर कुठं तरी जाऊन तडफडून ! तुझं तोंड पाहण्याची मला इच्छा नाहीं. ( तिला खोलींत ढकलतो. ) या हडळीनं माझ्या आयुष्याचा जसा नाश केला तसं ती तुझ्या आयुष्याचं वाटोळं करील, तेव्हां तिचं समाधान होईल ! पण तें पाहायला रहातोंय कशाला मी या घरांत ! चाललों हा—

[ जाऊं लागतो तोंच समोरून मावशी येते. काकांचे शब्द ऐकून ती एकदम भडकते.

**मावशी** : ( रागानें ) चाललों मी ?—कुठं चाललांत ?

**काका** : ( ओरडून ) मरायला ! ( मावशी सर्दच होते. काकांचें हें रौद्र स्वरूप तिनें आतांपर्यंत कधींच पाहिलेलें नसतें. ) आतांच्या आतां त्या बनेश्वराच्या डोहांत जाऊन मी जीवच देतों ! मी मेलों म्हणजे मग त्या पोरीचा तुला क ाय गळा कापायचा असेल तो खुशाल काप आणि तिला बळी देऊन टाक त्या म्हसोबाला !

**मावशी** : हो, हो, समजलं बरं ! मरायचं आहे ना तुम्हाला ? जा खुशाल मरा—पण आजच्या दिवस तरी मरूं नका ! आज संध्याकाळीं त्या पोरीच्या डोक्यावर अक्षता पडायच्या आहेत तोंपर्यन्त माझ्या कपाळाचं हें कुंकू राहूं द्या म्हटलं शिल्लक—

[ काका दातओंठ खात रागानें निघून जातात.

**प्रभात** : ( खोलीच्या दारांतून ) अग, अडव त्यांना—

**मावशी** : तें काय म्हातारं मरतंय ! येईल आत्तां परत !

# [ ३ ]

चंडोलच्या खोलीबाहेरची ग्यालरी. चंडोल तावातावानें प्रवेश करतो. त्याच्या हातांत एक पत्र आहे. त्याचा एक हात नीरा ओढीत आहे. तिच्या मागून चंदूही येते !

**चंडोल** : तुम्ही मला अडवूं नका, नीराबाई ! यापुढें मी जिवंत राहणं शक्य नाहीं ! या पत्रानं माझ्या जखमी जिवाच्या अगदीं ठिकऱ्या ठिकऱ्या करून टाकल्यात !

**मावशी** : मी सांगतें तुमचा हा कवी कुठं असेल तें !

**चतुर्भुज** : कुठं ?

**मावशी** : (ओठाला आंगठा लावून) टेर पिऊन पडला असेल कुठं तरी एखाद्या गुत्त्यांत ! आला शुद्धीवर म्हणजे येईल परत.

**चतुर्भुज** : छे, छे, भलतंच ! तसल्यापैकीं नाहीं तो !

**मावशी** : कांहीं सांगूं नका तुम्ही. तुमचे हे कविलोक म्हणजे सारे दारुबाज आणि दुर्वतनी. मला काय माहीत नाहीं होय !

**चतुर्भुज** : तुमचा कांहीं तरी गैरसमज झाला आहे मावशी.

**मावशी** : माझा अतिशय चांगला समज झाला आहे. आतांपर्यंत नुसतं ऐकतच होतें कानांनीं. पण आतां तर प्रत्यक्ष डोळ्यांनींच पाहिलं आहे. हीच ना त्याची ती बया आणि मुलगी—

**चतुर्भुज** : ऐकेल ती !

**मावशी** : ऐकलं तर ऐकलं ! मी काय कोणाच्या बापाला भितें आहें त्याला करायला लाज नाहीं, मग आपल्याला बोलायला कशाला पाहिजे भय खुशाल राजरोस रहातात आपलीं एके ठिकाणीं ! यांना जनामनाची कांहीं तरी लाज ? छे, छे, माझ्या अंगावर तर अगदीं शहारा येतो. कशीं माणसं असतात या जगांत एकेक !

**चतुर्भुज** : तसल्यापैकीं ही बाई नाहीं, मावशी ! फार निराळी आहे ती आणि आमच्या कवीबद्दल तर आपण गॅरंटी देतों. इतके दिवस मी येतों आहे यांच्याकडं. पण एक दिवस मीं यांना भलतंसलतं बोलतांना किंवा वागतांना कधी पाहिलं नाहीं !

**मावशी** : अगदीं बावळट आहांत तुम्ही, चतुर्भुज ! अहो, तुमच्या देखत भलतं सलतं कसं करतील तीं ? आणि समजा त्यांनीं केलं कांहीं, तर तुमच्यासारख्या ब्रह्मचाऱ्यांना त्यांतलं कळणार आहे काय डोंबल ?

**चतुर्भुज** : खरं आहे, आपण त्या बाबतींत अजूनपर्यंत तरी अगदींच अडाणी आहोंत !

**मावशी** : तेंच तर मी म्हणतें. नाहीं तर लोक गांवांत त्यांच्याबद्दल जें एकसारखं इतकं बोलतात तें काय उगाच ?

**चतुर्भुज** : लोकांच्या बोलण्यावर काय विश्वास ठेवायचा, मावशी ? लोक काय वाटेल तें बोलतात !

**मावशी** : वाटेल तें बोलायला लोक कांहीं गाढव नाहींत. आतां तुम्ही आमच्या घरीं इतके येतां. मी न् तुम्ही तास न् तास दिवाणखान्यांत अन् बागेंत गप्पा मारीत बसतों. पुष्कळ वेळां हे देखील नसतात तिथं. मग तुमच्या आमच्याबद्दल कां नाहीं हो बोलत असलं भलतं सलतं ?

**चतुर्भुज** : छे, छे, तुम्हीं अगदीं माझ्या आईसारख्या !

**मावशी** : आपलं वर्तन शुद्ध असलं म्हणजे लोकांची काय छाती लागली आहे बोलायची. आतां तुम्हांला स्पष्टच सांगतें. तुम्ही एवढी ह्या कवीची ग्यारंटी घ्यायला तयार झालांत, पण त्यानं गेल्या पंधरवड्यांत आमच्या घरांत काय काय घोटाळे केले आहेत याची तुम्हांला कल्पना आहे का ?

**चतुर्भुज** : काय म्हणतां ! कुणी ? या आमच्या चंडोल कवीनं ?

**मावशी** : हो, हो, या तुमच्या चांडाळ कवीनं ! तेवढ्यासाठीं तर मी आतां आलें होतें इथं—त्याचे कान उपटायला अन् त्याला बजवायला, कीं फार फाजीलपणा करशील तर सरळ मी तुला पोलीसच्या ताब्यांत देईन ! मला वाटतं मला भिऊनच तो पळाला असला पाहिजे कुठं तरी !

**चतुर्भुज** : पण केलं तरी काय त्यानं असं ?

**मावशी** : काय केलं ! सांगूं ? तुमचा विश्वास बसायचा नाहीं. अहो, आमच्या पोरीला पळवून न्यायचं केवढं भयंकर कारस्थान रचलं होतं त्यानं !

**चतुर्भुज** : काय म्हणतां ? अगदींच चाट पडलों आपण !

**मावशी** : मी होतें म्हणून ! नाहींतर त्या पोरीच्या जन्माचं वाटोळं केलं असतं या माणसानं ! चला, मीं सांगतें तुम्हांला सारं. मोठं रामायण आहे तें.

**चतुर्भुज** : ( जातां जातां ) कमाल केली या कवीनं ! छे, छे, आपण जन्मभर ब्रह्मचारी राहिलों तरी हरकत नाहीं, पण असलं आपल्या बापाच्यानं कधीं व्हायचं नाहीं !

[ जातात.

## [ २ ]

प्रभातचा दिवाणखाना. प्रभात प्रवेश करते.

**प्रभात** : माळी–ए माळी—

[ माळी येतो.

**माळी** : काय बाई ?

**प्रभात** : अरे, माझ्याकडं कोणी आलं होतं का ?

**माळी** : कुणी नाहीं बाई !

**प्रभात** : अन् तो मघांशीं पोस्टमन आला होतां ना. त्यानं माझं पत्र नाहीं क दिलं एखादं ?

**माळी** : या पोस्टाच्या संपापासून टपालाचा लई घोटाळा झाला आहे बाई.

[ जातो. प्रभात सचिंत मुद्रेनें कोचावर बसते व स्वतःशीं कांहीं तरी गुणगुण लागते.

पाहुं किती मी वाट ?
मावळला रवि नभांत,
लावि निशा सांजवात !
वाहतसे गगनाच्या
नयनांतून पूर !
रात्र पडे अंधारी
अजुनि सखा दूर !

[ गाणें संपतांच ती उठून आंतल्या खोलींत जाते. क्षणभरानें प्रक्षुब्ध मुद्रेनें चंडोल प्रवेश करतो. माळी त्याला अडवतो. पण त्याला न जुमानतां तो तसाच आंत शिरतो.

**माळी** : अहो–अहो–पण तुम्ही चाललांत कुठं थेट दिवाणखान्यापर्यंत ?

**चंडोल** : खबरदार मला अडवशील तर–दांत पाडीन मी !

**माळी :** ही काय रीत झाली बोलायची ? मावशीबाई घरांत नाहींत म्हणून सांगितलं तुम्हांला, अन् तुम्ही खुशाल आपले आंत घुसलांत !

**चंडोल :** मला मावशीबाईना भेटायचं नाहीं. मला धाकट्या बाईना भेटायचंय!

**माळी :** त्या आजोळीं गेल्या आहेत म्हणून सांगितलं ना तुम्हांला दहा वेळां. कां उगाच त्रास देतांय ?

**चंडोल :** साफ खोटं ! त्या घरांत आहेत ! काल रात्रीं त्या जलशाला गेल्या होत्या. मीं डोळ्यांनीं पाहिल्या. अन् आतां मीं त्यांना त्या खिडकींतून पाहिलंय बाहेरून ! ( मोठ्यानें ) प्रभात—

**माळी :** ( त्याच्या अंगावर धांवून येत ) बऱ्या बोलानं होता कीं नाहीं बाहेर, का मारूं—

**चंडोल :** हात तर लाव माझ्या अंगाला, खांडोळीं पाडीन ! ( आणखी मोठ्यानें ) प्रभात–प्रभात—

[ प्रभात एकदम दारांत येते.

**प्रभात :** ( आश्चर्यानें ) चंडोल !

[ चंडोलच्या प्रक्षोभाचा पारा तिला पहातांच एकदम खालीं जातो. तो तिच्याकडे रोखल्या नजरेनें पहातो. क्षणभर त्याच्या तोंडून शब्दही निघत नाहीं

**प्रभात :** ( भावनेनें ) चंडोल !

**चंडोल :** ( रुद्ध कंठानें ) प्रभात—( माळी निघून जातो. ) प्रभात ! तूं इथं ?

**प्रभात :** म्हणजे मी इथंच आहें !

**चंडोल :** गांवाला गेली होतीस तूं ?

**प्रभात :** मी !

**चंडोल :** आपल्या आजोळीं !

**प्रभात :** कुणीं सांगितलं तुम्हांला ?

**चंडोल :** ( आंवढा गिळून ) कुणीही ! दहा वेळां मी येऊन गेलों !

**प्रभात :** कधीं ? मला माहित नाहीं. अन् मी सारखी वाट पहातें आहें तुमची !

**चंडोल :** भेटण्याची इच्छा असलेल्या माणसाला भेटतां येईल ! भिकाऱ्यासारखं मला बाहेरच्या बाहेर हांकून दिलं !

**प्रभात :** म्हणतां काय तुम्ही हें ?

**चंडोल :** ( चढत्या सुरांत ) मला भेटण्याची तुझी इच्छा नव्हती तर छातीठोकपणें मला सांगितलं कां नाहींस तसं ! भागूबाईप्रमाणं हें बाहेरगांवीं जाण्याचं नाटक करायचं काय कारण होतं ?

**प्रभात :** ( चिडून ) हा मावशीचा उद्योग दिसतोय् सारा !

**चंडोल :** कालपर्यंत मला तसं वाटत होतं. पण काल रात्रीं माझी खात्री झाली कीं ह्यांत मावशीचा कांहीं एक संबंध नाहीं ! माझ्या पत्रांना उत्तर द्यायला मावशीनं तर तुझे हात बांधून ठेवले नव्हते ना ? आतांपर्यंत दहा पत्रं लिहिलीं मीं तुला !

**प्रभात :** दहा पत्रं मींहि लिहिलीं असतील तुम्हांला !

**चंडोल :** एक चिठोरं मिळालं नाहीं मला तुझं !

**प्रभात :** तुमचंही एक पत्र मिळालं नाहीं मला !

**चंडोल :** पत्र लिहिलंच नसलं तर कुठून मिळणार मला ? त्या दिवशीं संध्याकाळीं बनेश्वराच्या बागेंत मला रखडत ठेवून आपण खुशाल त्या पापडवाल्याच्या मोटारींत बसून सिनेमाला गेली ! कांहीं अंतःकरण आहे कीं नाहीं तुला ?

**प्रभात :** मावशीपुढं नाइलाज झाला माझा ! मीं दोन दिवसांनीं पत्र लिहून तुमची क्षमा देखील मागितली त्याबद्दल. पुन्हां पाहिजे तर आतां मागतें !

**चंडोल :** किती-किती गोष्टींबद्दल तूं क्षमा मागशील माझी ! जिथं अंतःकरणच नाहीं तिथं, क्षमेच्या या वरकरणी सोंगानं कुणाचं समाधान होईल ?

**प्रभात :** हें सोंग आहे माझं ? काय बोलतां काय तुम्ही चंडोल ? तरी बरं ! गेले आठ दिवस मी तुमच्या नांवाची जपमाळ घेऊन बसलें आहें इथं ?

**चंडोल :** माझ्या नांवाची जपमाळ घेऊन बसली आहेस तूं इथं ! ( उपरोधिकपणें हंसून ) बरोबर आहे, त्या मसालेवाल्याच्या मांडीला मांडी लावून त्याच्या मोटारींतून हिंडतांना, त्याच्या खांद्याला खांदा लावून सिनेमाला अन् रेसला जातांना आणि त्याच्या हातांत हात घालून काल रात्रीं तो जलसा ऐकतांना तुझ्या

हातांत एक जपमाळ असल्याचं पुष्कळांनीं पाहिलं आहे खरं ! ( ओरडून ) कसली माळ होती ती ? रुद्राक्षाची, स्फटिकाची का अश्रूची !

**प्रभात** : गोड गोड कविता करणाऱ्या कवीला इतकं दुष्टपणानं बोलतां येतं !

**चंडोल** : अन् गोड गोड हंसणाऱ्या एका सुंदर आणि तरुण मुलीला एवढं कपट करतां येतं ?

**प्रभात** : खोटं आहे तें ! मीं कांहीं कपट केलेलं नाहीं !

**चंडोल** : काय खोटं आहे ? त्या हलकट माणसाबरोबर गांवभर हिंडली नाहींस तूं मोटारींतून ?

**प्रभात** : हो, हिंडलें—

**चंडोल** : त्याच्याबरोबर सिनेमाला गेली नाहींस—हॉटेलांत गेली नाहींस—रेसला गेली नाहींस ?

**प्रभात** : गेलें—गेलें—

**चंडोल** : काल रात्रीं हिराबाईच्या जलशाला अगदीं पहिल्या रांगेमध्यें त्याच्या गळ्यांत गळा घालून बसली नाहींस बेशरमपणें ? ( प्रभात बोलत नाहीं. ) बोल—बोल—आतां कां दांतखिळी बसली ! मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलं आहे ! मी वर ग्यालरींत बसलों होतों. सारे लोक तुमच्याकडे पाहून हंसत होते आणि काय वाटेल ते बोलत होते. खालीं उतरून तुमचा दोघांचा खून करायचा विचार होता माझा. अगदीं डोकं फिरून गेलंय माझं ! सारी रात्र भ्रमिष्टासारखा मी भटकतों आहें कुठं तरी ! यापुढें जगण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. ( सद्गदित स्वरांत ) हें तुझं माझ्यावरचं प्रेम होय ? ही तुझी माझ्याबद्दलची निष्ठा ?

**प्रभात** : ( शांतपणें ) फार गैरसमज करून घेतला आहे तुम्हीं माझ्याबद्दल. कांहीं एक संबंध नाहीं माझा त्या माणसाशीं ? मला त्याचा तिरस्कार वाटतो अतिशय. तोंड पहाणार नाहीं मी त्याचं यापुढं !

**चंडोल** : कोण तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेवील ? गांवांतले कुटाळांचे अड्डे तुमच्या दोघांच्या नांवांनीं नुसते दुमदुमत आहेत ! कसं हें मी सहन करूं ? म्हणूनच तुला मी आज विचारायला आलों आहें—अगदीं स्पष्टपणें विचारायला आलों आहें. काय कळायचं असेल तें एकदां तुझ्याच तोंडून कळूं दे. म्हणजे जिवाला निष्कारण यातना नकोत !

**प्रभात** : काय कळूं दे ?

**चंडोल** : हेंच कीं तुझं या माणसावर प्रेम आहे; आणि तूं त्याच्याशीं लग्न करायचं ठरवलं आहेस.

**प्रभात** : अगदीं वेडे आहांत तुम्ही ! तुम्हांला हें खरं वाटतं ? तुम्हांला हें शक्य वाटतं ?

**चंडोल** : कां वाटूं नये ? तुझ्यासारखी एक सुशिक्षित, सुसंस्कृत आणि काव्यमय मुलगी एका दीडदमडीच्या मसालेकुट्याबरोबर एवढी मैत्री करील हें पूर्वी कधीं तरी मला शक्य वाटलं असतं काय ?

**प्रभात** : फुकट, फुकट तुम्ही कवि झालांत, चंडोल ! आभाळांत भराऱ्या मारून कशाला तीं ग्रहगोलांचीं न् चांदण्यांचीं कोडीं सोडवतां ? अनंत काळाचा पडदा फोडून भविष्याच्या पोटांतलीं रहस्यं शोधून काढण्यासाठीं कशाला तुम्हीं आपली प्रतिभा झिजवतां ? दोनशें वर्षांनंतरच्या भारतांतल्या आदर्श स्त्रीचं चित्र रंगविण्याची आकांक्षा धरणाऱ्या तुमच्यासारख्या द्रष्ट्या कवीला दोन हातांवर उभ्या असलेल्या एका स्त्रीचं अंतःकरण देखील कळूं शकत नाहीं !

**चंडोल** : तिला अंतःकरण असेल तर तें मला कळूं शकेल कीं नाहीं ! तुला अंतःकरण असतं तर आपल्या सौंदर्याचं जाळं टाकून अनेकांच्या आयुष्याचा तूं आजपर्यंत कां सत्यानाश केला असतां !

**प्रभात** : ( ओरडून ) चंडोल ! काय बोलतां आहांत ?

**चंडोल** : आतां मी बोलायला काय भिईन काय ? कॉलेजमधल्या तुझ्या रंगेल जीवनाचा आतां मला पूर्ण पत्ता लागला आहे. सकाळपासून मी त्याच शोधावर आहें. गांवामधला एक माणूस तुझ्याबद्दल चांगलं बोलत असेल तर शपथ ! मीच मूर्ख म्हणून तुझ्या नादीं लागलों. बोल, माझ्याप्रमाणें आजपर्यंत तूं किती तरुणांचे गळे कापलेस ?

**प्रभात** : खबरदार असं बोलाल तर—

**चंडोल** : माझ्या तोंडाला तूं हात लावशील, पण जगाचं तोंड तूं कसं बंद करशील ?

**प्रभात** : आजपर्यंत जगाची तुम्हीं कदर केली नाहींत–आतां तुम्हांला जगाची परवा वाटूं लागली होय ! कवि कवि म्हणून जग तुम्हांला डोक्यावर घेऊन नाचलं

म्हणून जगाच्या बडबडीवर तुम्ही नाचायला लागलांत; आणि तुम्ही माझ्या प्रेमाला आणि अब्रूला पायाखालीं तुडवायला तयार झालांत होय ? तुमच्यावर मीं प्रेम केलं, माझं सर्वस्व मी तुमच्या हातीं द्यावयाला तयार झाले, म्हणून माझा वाटेल तसा अपमान करण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे ?

**चंडोल** : तुझं माझ्यावर प्रेम असतं तर असला 'मूर्ख' प्रश्न विचारायचं तुला धैर्यच झालं नसतं ! सर्वस्वाचं दान करणाऱ्या प्रेमिकाला आपल्या मानापमानाची आठवण कधीं होत नाहीं, प्रभात ! तूं माझ्यावर प्रेम केलंस ? मीं तुझ्यावर प्रेम केलं आणि मीं माझं सर्वस्व–माझं काव्य तुझ्या पायावर अर्पण केलं ! माझ्या गालावरच्या प्रेमाच्या अश्रूंचे ओघळ अद्याप सुकले देखील नाहींत–माझ्या प्रेमकाव्याची तांबडी शाई अजून वाळली देखील नाहीं–तोंच पैशाच्या मोहानं एका दीड दमडीच्या माणसाखातर तूं माझ्या प्रेमाचा आणि कवितेचा लिलांव करून टाकलास ! त्या दिवशीं तो घोडके म्हणाला तेंच खरं. दुनिया हा एक बाजार आहे ! ज्याच्याजवळ पैसा असतो त्याचाच शेवटीं सौदा पटतो !

**प्रभात** : अस्सं ! प्रेम म्हणजे पैशानं खरेदी करतां येण्यासारखा बाजारी सौदा वाटतो तुम्हांला ! हृदय हा पैशाच्या किंमतीनं दुसऱ्याला विकतां येण्यासारखा माल वाटतो तुहांला ! मग असं जर आहे तर प्रेमाच्या अमरत्वावर आणि हृदयाच्या पावित्र्यावर आजपर्यंत त्या खंडोगणती कविता रचून शाईचा न् कागदांचा कशाला नाश केलांत निष्कारण ? सृष्टीच्या सौंदर्याचीं रात्रंदिवस स्तोत्रं गाणाऱ्या तुमच्यासारख्या सौंदर्यपूजकाला प्रेमाची अशी क्रूर विटंबना माझ्यासमोर करतांना लाज वाटायला हवी ! प्रेमाबद्दल तुम्हांला आदर नाहीं, स्त्रीच्या हृदयाची तुम्हांला कदर नाहीं–तुम्ही कसले कवि ! काव्य हें तुमचं निव्वळ ढोंग आहे ढोंग ! पोकळ धमक्यांच्या जोरावर स्त्रीवर सत्ता चालविणारे, किडलेल्या अंतःकरणाचे तुम्ही एक भ्याड आणि संशयी पुरुष आहांत ! दुसरं काय ?

**चंडोल** : काव्य हें माझं ढोंग नसून, प्रेम हें मात्र तुझं सोंग आहे ! माझं मन संशयानें किडलेलं नसून पैशाच्या मोहानं तुझं मन सडलेलं आहे ! केवळ दारिद्र्यामुळंच तुला माझं काव्य आज कवडीमोल वाटूं लागलं आहे ! नाहीं तर द्रोणामधल्या अमृताला लाथाडून सोन्याच्या बरणीमधल्या त्या नासक्या लोणच्यांत तोंड खुपसायला तूं कधींही तयार झाली नसतीस !

**प्रभात** : ( संतापून ) आतां कृपा कराल काय ? तुमचा एक शब्द ऐकायची तयारी नाहीं माझी आतां !

**चंडोल :** आजपर्यंत मी तुला शब्दसृष्टीचा ईश्वर वाटत होतों. माझ्या काव्यांतला एक एक शब्द डोक्यावर घेऊन जन्मभर नाचायची तुझी तयारी होती! आणि आतां माझ्या तोंडांतला एक शब्द ऐकायची देखील तुझी तयारी नाहीं काय? इतका तिरस्कार वाटूं लागला होय तुला माझ्या काव्याचा आणि शब्दांचा!

**प्रभात :** जोंपर्यंत तुमच्या मनांत आणि हृदयांत काव्य नाहीं तोंपर्यंत बाहेरच्या शब्दांचं हें तुमचं काव्य सगळं खोटं आहे! आग लावा असल्या त्या काव्यांना आणि शब्दांना!

**चंडोल :** तूंच आग लाव तुझ्या त्या बेगडी सौंदर्याला! साऱ्या जगाला मी आतां ओरडून सांगेन–प्रेमाच्या फसव्या जादूनं पुरुषांची नजरबंदी करणारी ही एक मायावी चेटकीण आहे चेटकीण!

**प्रभात :** मी देखील जगाला ओरडून सांगेन कीं, नुसत्या शब्दांच्या कसरती करून भोंवताली गर्दी जमविणारा हा साहित्यांतला एक डोंबारी आहे डोंबारी!

**चंडोल :** तुझं तोंड पाहणार नाहीं फिरून—

**प्रभात :** जातां कीं नाहीं आतां तुम्ही इथून—

[ काका एकदम प्रवेश करतात. त्यांचा चेहरा अतिशय बावचळल्यासारखा दिसतो आहे.

**काका :** ( एकदम मोठ्यानें ओरडून ) ए! अरे, चालविलंय् काय तुम्हीं हें? ही पोरगी तर आपल्या मावशीवर कडी आहे. लग्न व्हायच्या अगोदर ही इतकी भांडखोर, तर मग पुढं काय होईल ही? कवि, तुम्ही बसा पाहूं तिथं मुकाट्यानं!

**प्रभात :** काका, तुम्ही आमच्या भानगडींत पडूं नका!

**काका :** कां पडूं नका? जरूर पडणार! तूं देखील मला तिच्यासारखीच डाफरायला लागलीस कीं काय? अग, वा ग वा! ती म्हणतें, तुम्ही माझ्या भानगडींत पडूं नका! तूं म्हणतेस–तुम्ही माझ्या भागडींत पडूं नका! मग आम्ही पडायचं कुणाचा भानगडींत? ( आंतून मावशी ‘ प्रभात–प्रभात ’ असें मोठ्यानें ओरडते. ) अरे बापरे, ही आली वाटतं आमची महामाया? मग निकालच लागला. आतां मरा तुम्ही अन् ती—

[ घाईघाईनें आंत जातात. मावशी तावातावानें प्रवेश करते. चंडोलला पहातांच ती एकदम दारांतच थबकते.

**मावशी** : ( रागानें ) चंडोल ! ( चंडोल तिच्याकडे रोखल्या नजरेनें पहातो. ) शरम नाहीं वाटत तुम्हांला या घरांत पाऊल टाकायला ?

**चंडोल** : ( आश्चर्यानें ) म्हणजे ?

**मावशी** : चालता हो इथून—

**प्रभात** : ( मध्येंच ) मावशी—

**मावशी** : नाहीं तर धक्के मारून मी हांकून देईन—

**प्रभात** : मीं बोलावलं त्यांना !

**मावशी** : काय तूं ?

**प्रभात** : हो मी ! ( चंडोल रागानें जाऊं लागतो त्याला ) जाऊं नका तुम्ही, चंडोल ! ( चंडोल 'उं: !' म्हणून तुच्छतेनें तिच्याकडे पहातो. ) माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्ही गेलांत तर !

[ त्याच्यामागें धांवते.

**मावशी** : जाऊं दे त्याला ! सभ्य माणसांच्या घरांत पाऊल टाकायच्या लायकीचा नाहीं हा माणूस !

**चंडोल** : ( त्वेषानें मागें वळून ) काय म्हणालांत ?

**मावशी** : एका अनाथ विधवेच्या आयुष्याचा सत्यानाश करून, फिरून एका कुमारिकेला आयुष्यामधून उठवूं पहातोस होय ?

**प्रभात** : ( मावशीच्या तोंडावर हात ठेवून ) मावशी, काय बोलतेस—

**मावशी** : ( तिचा हात झिडकारून ) मी काय बोलतें ? सारं गांव बोलतंय् ! प्रत्यक्ष डोळ्यांनीं मीं जें पाहिलें तें मी बोलतेंय् ! स्वतःला कवि म्हणवतोय् कवि ! ज्याला लाज नाहीं, अब्रू नाहीं, नीति नाहीं, त्याच्या काव्याला काय जाळायचंय ? आग लाव तुझ्या कीर्तीला अन् काव्याला !

**प्रभात** : ( चंडोलला ) तुम्ही हिचं ऐकूं नका चंडोल ! ही काय बोलते आहे तें हिचं हिला कळत नाहीं !

**मावशी** : मी काय बोलतें आहे तें मला कळत नाहीं ? मला—मला खोट्यांत पाडतेस होय ? मग विचार—तूंच त्याला विचार—नाहीं तर मीच विचारतें. मला काय त्याच्या बापाची भीति आहे ? एका विधवा बाईला घेऊन तूं आपल्या घरांत राहतोस कीं नाहीं ? तिच्यापासून तुला एक मुलगी झाली आहे कीं नाहीं ?

**प्रभात :** ( चंडोलच्या चेहऱ्याकडे पहात ) साफ खोटं आहे हें !

**मावशी :** तूं कशाला मधें बोलतेस ! त्याला सांगूं दे–त्याला सांगूं दे–

**प्रभात :** सांगा–सांगा–चंडोल, हें सारं खोटं आहे–हें साफ साफ खोटं आहे !

**मावशी :** त्याची काय छाती आहे खोटं म्हणायची ! चांगला राजरोस त्या बाईला घेऊन चाळींत राहतो अन् साऱ्या गांवभर आपल्या पोरीला घेऊन भटकत फिरतो—

**प्रभात :** ( एकदम आठवून ) म्हणजे ती चंदू म्हणतेस कीं काय ?

**मावशी :** ( हर्षानं ) आतां झाली तुझी खात्री ? चंदू–चंदू ! चंदूच तिचं नांव !

**प्रभात :** नाहीं–नाहीं–तें शक्य नाहीं ! सांगा चंडोल, सांगा हें खरं नाहीं म्हणून–

**चंडोल :** खरं का खोटं विचारायचा तुम्हांला काय अधिकार आहे ? तुमचा हा सिद्धसाधकपणा आतां चांगला माझ्या लक्षांत आला ! आयुष्यांतून मला सपशेल उठवून टाकण्याचा तुमचा हा डाव आहे, हें न कळण्याइतका मी कांहीं मूर्ख नाहीं ? स्वतःचीं पापं लपवण्यासाठीं तुम्ही माझ्या नांवाची बदनामी करतां अन् माझ्या तोंडाला काळोखी फांसतां !

**मावशी :** माळी–ए माळी—

**चंडोल :** मी बदफैली आहें हें सिद्ध करण्यांत तुम्हांला समाधान वाटत असेल तर मीच सांगतों तुम्हांला माझ्या तोंडानं. अहो, एकच काय, गांवांत छपन्न बायका आहेत माझ्या ! झालं ? आतां मारा माझ्या नांवानं बोंबा ! जा—

[ त्वेषानें निघून जातो. प्रभात एकदम तोंड झांकून घेते.

**मावशी :** ऐकलंस–ऐकलंस आपल्या कानांनीं ? गांवांतल्या छपन्न बायकांशीं संबंध आहे त्याचा ! अन् मीं तर एकाच बाईबद्दल ऐकलं होतं ! स्वतःच्या तोंडानं कबूल करायला लाजा सुद्धां नाहीं वाटत मेल्यांना ! ( काका एका दारांतून जोरानें बाहेर जाण्याचा प्रयत्न करतात. ) तुम्ही कुठं चाललांत बाहेर त्याच्या मागून ? फिरा मागं ! खेटरांनीं ठेचायला पाहिजे असल्या पुरुषांना !

**काका :** ( वळून ) पण मीं काय केलं ?

**मावशी :** तीन लग्नं केलींत तुम्हीं ! आणखी काय करायला पाहिजे ? व्हा चालते. ( काका घरांत जातात. ) सारे पुरुष मेले एकाच माळेचे मणी ! तीन काय अन् छपन्न काय ? ( प्रभात तोंड झांकून मोठमोठ्यानें हुंदके देते. तिच्या जवळ जाऊन आणि कुरवाळीत ) नको, रडूं नकोस. उगा–उगा. यांना काळजं नाहींत काळजं !

**प्रभात :** ( मावशीला एकदम मिठी मारून ) मावशी, मला क्षमा कर, माझी चूक झाली. आजपर्यंत मीं तुझं ऐकलं नाहीं. अतिशय मूर्ख आहें मी. माझे अपराध पोटांत घे ग मावशी—

[ मावशीच्या खांद्यावर डोकें ठेवून मोठमौठ्यानें हुंदके देऊं लागते.

**मावशी :** नको रडूंस आतां. किती केलं तरी मी तुझ्या आईची बहीण आहें; अगदीं तुझ्या आईच्या जागींच आहें म्हण. तुझं अन् माझं रक्त एकच नाहीं का ? मी तुझे अपराध पोटांत घालणार नाहीं–मी तुझ्या चुकांवर पांघरूण घालणार नाहीं–तर दुसरं कोण बरं घालणार ? नको रडूंस. तूं त्याच्यासाठीं रडावंस अशी त्याची काय लायकी आहे मेल्याची ?

**प्रभात :** आजपर्यंत मी तुला नाहीं नाहीं ते बोललें. अनेक वेळां तुझा मीं अपमान केला—

**मावशी :** अग, हो हो हो–तें सगळं–सगळं मी विसरून गेलें बरं ! लहान मुलाचं बोलणं मनावर का घ्यायचं असतं मोठ्यांनीं ?

**प्रभात :** आतां मी सर्वस्वीं तुझ्या स्वाधीन आहें. काय माझं करायचं असेल तुला तें कर. तार–मार—

**मावशी :** असं नको ग बोलूंस–माझी गुणाची बाळ ती ! तुला वाटतं तितकी ही तुझी मावशी दुष्ट नाहीं बरं ! मी तोंडाची फटकळ असेन पण मनाची फार निर्मळ अन् सरळ आहें ! अगदीं दुधाच्या धारेसारखी. मला खोटं मुळींच सहन होत नाहीं, अन् दुसऱ्याचं वाईट झालेलं तर बिलकूल बघवत नाहीं. तुझ्या आईनं मरायच्या वेळीं तुला माझ्या ओटींत घालून सांगितलं कीं, ' छबे, माझ्या प्रभातला तूं अंतर देऊं नकोस बरं ! ' ( एकमद मोठ्यानें गळा काढून रडूं लागते. ती रडते तशी प्रभातही रडते. कांहीं वेळ दोघीही रडत रहातात. कुणीच बोलत नाहीं. मग थोड्या वेळानें हुंदके देत देत ) तेव्हांपासून मीं तुला पोटच्या पोराप्रमाणें वाढाविली. रात्रीच्या रात्री जागून तुझीं मोठमोठालीं दुखणींभाणीं काढलीं. तुझ्यासाठीं माझं अंतःकरण किती तिळतिळ तुटतं म्हणून सांगूं ! ( एकदम स्वर बदलून ) अन् तुझे हे काका म्हणतात कीं मला अंतःकरण नाहीं म्हणून. अशी चीड येते मेल्या या पुरुषांची !–ही ही लग्नाची अन् मुलाबाळांची भानगड नसती तर एका पुरुषाचं तोंड पाहिलं नसतं आम्हीं बायकांनीं !

**प्रभात** : ( हुंदके देत देत ) पण मावशी, खरंच सांग, एका स्त्रीशीं घरांत संबंध ठेवून, आणि तिच्या मुलाचा बाप होऊन, बाहेर दुसऱ्या स्त्रीवर प्रेम करण्याचं नाटक कसं ग करवतं या पुरुषांना ? स्त्रीच्या हातून असलं कपट कध्धीं कध्धीं व्हायचं नाहीं ! ( एकदम निश्चयी चेहरा करून ) साऱ्या कविता जाळून टाकतें मी आतां त्यांच्या ! यापुढं आयुष्यांत काव्य म्हणून कधीं वाचणार नाहीं ! ( कपाटांतलीं एकदोन कवितांचीं पुस्तकें काढून बाहेर भिरकावून देते. ) काव्य खोटं आहे, काव्य फसवं आहे ! प्रेम हें निव्वळ ढोंग आहे. प्रेमाच्या वेडानं नादान बनलेल्या माझ्या हृदयावर सूड घेऊन मी माझ्या मनाचं सामर्थ्य जगाला दाखविणार ! बोल मावशी, तूं सांगशील त्या माणसाशीं मी आतां लग्न लावायला तयार आहें. तो आंधळा असो, लंगडा असो, नाहीं तर अडाणी फत्तर असो ! स्वतःच्या सुखाची होळी पेटवून त्याच्या संसाराची दिवाळी साजरी करायला मी आतां सिद्ध आहें ! अगदीं या क्षणाला—

**मावशी** : हें—हें सारं पत्रामधें लिहून त्या चांडाळाला कळव—

**प्रभात** : तें कशाला ?

**मावशी** : नाहीं तर तो लोचट फिरून पाठीमागं येईल तुझ्या. त्याला एकदम तोडून टाकायची हीच वेळ आहे. मनांत आलाय विचार तर तो त्या वेळींच पुरा करून टाकावा. ( टाक, दौत अन् कागद आणून तिच्यापुढें ठेवते. ) लिही—लिही त्याला—म्हणावं कीं यापुढं तुझं तोंड पाहण्याची माझी इच्छा नाहीं—तुझा माझा कांहीं संबंध नाहीं—तूं माझ्या घरांत पाऊल टाकतां कामा नये—मीं श्रीमान् नाथसाहेब घोडके यांच्याशीं लग्न करायचं ठरवलं आहे—लिही, थांबूं नकोस आतां. पुन्हां ही वेळ यायची नाहीं ! ( प्रभात हळूहळू पत्र लिहितें. तिच्या डोळ्यांतून अश्रू पाझरत आहेत. ती काय लिहितें आहे हें मधूमधून डोकावून मावशी पहात आहेत. ) लहानपणीं माझं देखील प्रेम बसलं होतं एका माणसावर. होता मेला असाच कोणी तरी मास्तर किंवा प्रोफेसर ! आमच्या घरासमोर रहात होता. त्यांनीं मला गोड गोड बोलून नादीं काय लावलं, पत्रं काय लिहिलीं. अन् मला तर मेलीला त्या वेळीं वाचतां देखील येत नव्हतं—अशीच मूर्ख होतें मी तुझ्यासारखी. मला तें खरं वाटलं. पण शेवटीं त्यांनीं अस्सा माझा गळा कापला ! म्हणून तर ह्या तुझ्या तिजवर म्हाताऱ्या काकांशीं मीं लग्न लावून त्या माणसाचं चांगलं नाक कापलं ! मी तरी काय कमी आहें का ? मीं खरंच सांगतें तुला, या प्रेमामुळं बायकांच्या आयुष्याचा नाश

होतो. नुसत्या प्रेमाला काय चाटायचंय्? कपडेलत्ते, दागदागिने, गाड्या–मोटारी, मुलंबाळं, मानसन्मान मिळाला म्हणजे झालं. (प्रभातच्या हातांतलें पत्र घेतें. प्रभातला एकदम रडूं आवरेनासें होतें. ती तोंड झांकून एकदम आंतल्या खोलींत जाते.) नाहीं तर या मेल्या नवऱ्यांना विचारतंय कोण? नवरे–नवरे–नवरे–(दुसऱ्या दारानें जाऊं लागते तोंच समोरून काका येतात.) पुन्हां बाहेर आलांत! आंत जाऊन बसा सांगितलं ना तुम्हाला? (काका आंत पळून जातात. मावशी प्रभातचें पत्र वाचून पहाते. तिच्या तोंडावर समाधानाचा आनंद झळकतो.) माळी–अरे–माळी–(माळी येतो.) हें पत्र घेऊन आत्तांच्या आत्तां चंडोल कवीच्या चाळींत जा; आणि त्याला हें दे. कांहीं बोलूं नकोस त्याच्याशीं. आणि तसाच उलट पावलीं परत ये. आणि हें बघ–बाहेर मोटारींत ते नाथसाहेब बसले आहेत—

**माळी** : नाथसाहेब!

**मावशी** : घोडके रे–तेच नाथसाहेब. त्यांना आंत पाठवून दे.

[ माळी निघून जातो. मावशीच्या आनंदाला आतां सीमा नसते. ती दिवाणखान्यांतल्या गोष्टी चटपट व्यवस्थित करण्याचा प्रयत्न करते. घोडके प्रवेश करतो.

**घोडके** : (हलक्या पण चिंतेच्या स्वरांत) काय झालं?

**मावशी** : काय व्हायचंय! त्याचा निकाल लावला! असा त्याला झाडलाय म्हणतां तिच्यासमोर! एक शब्द बोलायची छाती झाली नाहीं त्याची. मान खालीं घालून मुकाट्यानं निघून गेला!

**घोडके** : तें मीं पाहिलं. माझ्या मोटारीसमोरूनच तो गेला. अगदीं काळंठिक्कर तोंड पडलं होतं त्याचं. त्याला चिडविण्यासाठीं मी मुद्दाम खाकरलों देखील मोठ्यानं–पण त्यानं बघितलं नाहीं माझ्याकडे.

**मावशी** : फिरून तो इथं येणार नाहीं असाच पक्का बंदोबस्त करून टाकलाय मीं. निलाजरा मेला—

**घोडके** : पण माझ्याबद्दल काय केलंत?

**मावशी** : तुमचं काम झालं घोड–नाथसाहेब!

**घोडके** : (आनंदानें) झालं! काय म्हणतां!

**मावशी :** तिच्या हातून पत्रच लिहून घेतलं मीं त्याला कीं, श्रीमान् नाथसाहेब घोडके यांच्याशीं मीं लग्न करायचं ठरविलं आहे—मी म्हणजे तिनं !

**घोडके :** (हर्षातिरेकानें) खरंच ! खरंच ? त्यांनीं लिहिलं असं हें आपल्या हातानं ?

**मावशी :** मीं सांगितल्यावर ती काय लिहीत नाहीं ! हें काय, आतांच मीं तें पत्र माळ्याबरोबर पाठवून देखील दिलं त्याला !

**घोडके :** अहाहा, मावशी–मावशी, यू आर खरोखर अ ग्रेट बाई ! अ ग्रेट मड्डम् !

**मावशी :** हें पहा, आतां वेळ घालवूं नका. ती आंत बसली आहे. मी तिला बाहेर हांक मारतें. ती काय तुमची नवीन पद्धति असते ना त्याप्रमाणें तुम्ही तिला प्रत्यक्षच विचारा.

**घोडके :** अन् ती नाहीं म्हणाली तर—

**मावशी :** ती नाहीं म्हणणार नाहीं ! असं काय करतां ? मीं तें सगळं शिजवून ठेवलं आहे. (हलकेंच) हो, पण माझ्या पंचवीस हजार रुपयांचं तें तुम्हांला कबूल आहे ना ?

**घोडके :** पंचवीस हजार रुपये तुम्ही काय घेऊन बसलांत, मावशी ! ती मला हो म्हणूं द्या—त्या क्षणाला पंचवीस नाहीं पन्नास हजार रुपये मोजतों मी खणखणां तुमच्यापुढं ! यू डोन्ट नो धिस् घोडके ?

**मावशी :** मला स्वतःला त्यांतली एक पै नको आहे बरं, घोडके ! तिच्याच नांवावर मला ते निराळे करून ठेवायचेत. जातें मी. (दारापाशीं जाऊन अत्यंत प्रेमळ स्वरांत) प्रभात, अग प्रभात, बाहेर ये पाहूं. हे नाथसाहेब भेटायला आले आहेत तुला. (हलक्या स्वरांत घोडक्याला) आतां पुढचं सगळं तुमच्याकडे लागलं बरं !

[हंसत आंत जाते. घोडके खिशांतून लहानसा आरसा काढून आपला चेहरा बघतो व कपडे साफसूफ करतो. भीतीनें त्याची छाती उडूं लागते म्हणून कीं काय, मध्येंच तो आपल्या छातीलाही हात लावून पाहतो. थोड्या वेळानें आंतून प्रभात खालीं मान घालून येते; आणि कपाळाला हात लावून कोचावर बसते. क्षणभर कोणीच बोलत नाहीं. घोडके भीतभीत दुसऱ्या खुर्चीवर बसतो.

**घोडके :** ( अखेर मनाचा निश्चय करून ) म्हटलं, मी आलोंय—

**प्रभात :** ( त्याच्याकडे न पाहतां विमनस्कपणें ) काय म्हणालांत !

**घोडके :** म्हटलं–मी आलोंय. आय–यूवर–घोडके.

**प्रभात :** बसा—

**घोडके :** माफ करा. मी आधींच बसलोंय. ( थोडें थांबून ) आपल्याकडं–माझं–थोडंसं काम होतं—

**प्रभात :** अस्सं !

**घोडके :** मावशीनं आपल्याला त्याची कल्पना दिलीच असेल—

**प्रभात :** हो—

**घोडके :** प्रकृति बरी नाहीं वाटतं आज ? हल्लीं जगांत एकंदर हवाच वाईट पडली आहे. त्यांतून हे पोष्टांचे अन् आगगाड्यांचे संप आणि हिंदु–मुसलमांचे दंगे, म्हणजे काय कीं ( व्याख्यानाच्या स्वरांत ) राष्ट्राची एकंदर घडीच बिघडून गेली आहे !

**प्रभात :** हळू बोला–माझं डोकं दुखतंय—

**घोडके :** सॉरी, आय पार्डन यू. मी आपला कांहीं फार वेळ घेत नाहीं आणि मला कांहीं फार बोलायचंही पण नाहीं.

**प्रभात :** फार बोललेलं मला आवडत नाहीं.

**घोडके :** अगदीं पटलं ! या बाबतींत तुमचा अन् आमचा स्वभाव जुळला. मला देखील फार बोललेलं आवडत नाहीं. उगाच आपलं बोलायचं म्हणजे काय !

**प्रभात :** करा सुरुवात—

**घोडके :** यस्, यस्, करतों. मला जें तुम्हाला सांगायचं आहे तें वास्तविक सांगण्याची देखील जरूरी नाहीं. कारण मावशींना मीं तें सारं आधींच सांगून ठेवलं आहे; आणि त्या बाबतींत त्यांनीं होकारही पण दिलेला आहे. उलट त्या असंच म्हणाल्या कीं, तुम्हांला आतां विचारायची देखील जरूरी नाहीं. ( आंतून मावशी डोकावून हातानें खुणावतात, कीं 'असं म्हणूं नका म्हणून' ) पण मीच त्यांना म्हणालों कीं, नाहीं–तुमच्या तोंडून प्रत्यक्ष रुकार मिळाल्याखेरीज माझी खात्री होणार नाहीं ! ( मावशी पसंतीची खूण करते. ) हो, कारण हें लग्नाचं काम आहे. ज्याचं त्यानंच ठरवायला पाहिजे. ( थांबून ) अरेच्या, चुकलं कीं माझं–लग्नाचं मीं शेवटीं बोलायचं तें आधींच बोलून गेलों !

**प्रभात** : आटपा लवकर—

**घोडके** : माफ करा हं ! आम्हाला आपलं सांभाळून घ्या. ही आमची पहिलीच वेळ आहे. त्यांतून स्वतःचं लग्न स्वतः ठरविणारा आमच्या घराण्यांतला मी पहिलाच पुरुष आहें. आपल्याला मी पुष्कळ दिवसांपासून ओळखतों. आपणही मला ओळखत असालच. कारण आम्ही तर अतिशय पब्लिक आहोंत. सारं हिंदुस्थान आम्हांला ओळखतं. गेल्या आठदहा दिवसांत तुमची आमची जी दाट मैत्री झाली त्यामुळें तुम्ही मला अतिशय आवडूं लागलां आहांत; आणि माझी खात्री आहे कीं, यू ऑल्सो लाईक्स टु मी ! ( प्रभात जांभई देते. ) सत्य आहे. तुम्ही बी. ए. आहांत. शिकलेल्या आहांत. मी कांहीं शिकलेलों नाहीं. पण तसा मी फार हुशार आहें; आणि इंग्रजी कम्स टु मी व्हेरी वेल् ! आतां तुम्हीं म्हणाल कीं, तुम्हाला शिकलेली बायको कशाला पाहिजे !

**प्रभात** : जातें मी—मला बरं वाटत नाहीं.

**घोडके** : एकच मिनिट आणखी—शिक्षणाची ही एकच बाब वजा केली तर बाकीचं तुमचं आमचं अगदीं सारं जुळण्यासारखं आहे. तुम्हाला काव्य आवडतं, मलाही काव्य आवडतं.

**प्रभात** : काव्याचा मला अत्यंत तिटकारा आहे !

**घोडके** : काय म्हणतां ! मग प्रश्नच मिटला. मला तर काव्याची भयंकर चीड आहे. पण माझी कल्पना झाली कीं तुम्हांला काव्य आवडतं; म्हणून म्हटलं कीं आपणही दडपून सांगावं कीं आपल्यालाही काव्य फार आवडतं म्हणून ! आतां शेवटचा प्रश्न म्हणजे पैशांचा ! त्या बाबतींत तर आमची पोझीशन् भलतीच स्ट्रॉंग आहे ! पैशाची आपल्याला बिलकूल पर्वाच नाहीं म्हणानात ! आमची आजी वारली तेव्हां तिच्या अंगावर मीं दोन हजारांचा खुर्दा उधळला ! मग आपल्याकरतां तर मी वाटेल तितका पैसा उधळायला तयार आहें.

**प्रभात** : ( उपहासानें ) थँक यू !

**घोडके** : गेल्या आठ दिवसांत तुमच्यासाठीं मीं किती पैसे खर्च केले हें तुम्हांला अन् मावशीला ठाऊक आहे. त्याखेरीज तुम्ही हो म्हणालांत तर पंचवीस हजार रुपये—( मावशी आंतून भयंकर चेहरा करून दटावते. ) चुकलों, तें इतक्यांत नाहीं बोलत. सांगण्याचा अर्थ इतकाच कीं, दागदागिने, मोटारगाड्या, नोकर-चाकर, मुलंबाळं या बाबतींत माझ्याकडून कांहीं कमी पडायचं नाहीं तुम्हाला.

एकंदर पांच बँकेंत माझीं खातीं आहेत. तीं हीं पांच बुकं म्हणजे साक्षात् माझे पंचप्राण मी आपल्या पायांवर वाहयला तयार आहें.

[ खिशांतून चेकपुस्तकें काढून तिच्या पायांवर वाहूं लागतो.

**प्रभात :** तुमचे हे पंचप्राण तुमच्या खिशांत ठेवा! (उठून) तेव्हां एकंदरींत तुमचं म्हणणं असं कीं, तुम्हाला माझ्याशीं लग्न करायचं आहे.

**घोडके :** (आशेनें) आलं ना तुमच्या ध्यानांत ? मग संपलं माझं बोलणं.

**प्रभात :** (डोळे मिटून) ठीक आहे. मी तुमच्याशीं लग्न करायला तयार आहें!

**घोडके :** म्हणजे अगदीं फायनल ना हें ?

**प्रभात :** पण एका अटीवर—

**घोडके :** अट आहेच का अजून ?

**प्रभात :** लग्न झालं तरी माझं शरीर तुम्हांला मिळेल—मन मिळणार नाहीं.

**घोडके :** (चिंतातुर चेहरा करून) असं म्हणतां होय ? कांहीं हरकत नाहीं. आम्ही बोलून चालून व्यापारी माणसं. शरीर काय अन् मन काय! आमच्या दृष्टीनें दोहोंचा हिशेब एकच.

**प्रभात :** माझ्या म्हणण्याचा अर्थ तुम्हाला कळला नाहीं, घोडके!

**घोडके :** माझं नांव एकनाथ आहे. मावशी मला नाथसाहेब म्हणतात. आपण मला नाथ म्हटलं तरी चालेल.

**प्रभात :** मला घोडकेच नांव अधिक पसंत आहे.

**घोडके :** मर्जी आपली!

**प्रभात :** मी तुमची पत्नी झालें तरी माझं प्रेम तुम्हाला मिळणार नाहीं.

**घोडके :** तें बघून घेऊं हो पुढं! आज त्यावांचून तर कांहीं अडत नाहीं! (प्रभात निघून जाते.) अहो, पण थांबा. ही आंगठी राहिली!

[ मावशी येते आणि त्याच्या हातून आंगठी घेते.

**मावशी :** आणा इकडे. मी देईन तिला. (हंसून) बोला, काय सांगितलं मीं तुम्हांला ? झालं आतां तुमच्या मनासारखं!

**घोडके :** मावशी—मावशी—या वेळीं मला इतका आनंद झाला आहे की एकदम तुम्हाला मिठी मारून—

**मावशी :** ( दटावून ) काय हें !

**घोडके :** चांगल्या हेतूनं म्हणतोंय मी ! खरोखर, आज मी धन्य झालों. बोला आतां मूहूर्त कधीं ठरवतां ?

**मावशी :** कधीं काय ? आज संध्याकाळीं गोरज मुहूर्तावर हें लग्न लागलंच पाहिजे !

**घोडके :** आज संध्याकाळीं ? पण इतक्या लवकर ही तयारी होणार कशी मावशी ?

**मावशी :** तें सारं माझ्याकडे लागलं ! कांहीं तयारी करायची नाहीं अन् कुणाला बोलावायचं नाहीं ! तुमचं दोघांचं लग्न लागल्याशीं कारण !

**घोडके :** अगदीं पटलं ! मलाही हें लग्न असंच व्हावं अशी इच्छा आहे.

**मावशी :** तुम्हाला या पोरीचा स्वभाव माहित नाहीं, घोडके. ती हो म्हणाली आहे तेवढ्यांत आपलं उरकून घेतलेलं बरं. उद्यां ती नाहीं म्हणाली तर करतां काय ?

**घोडके :** ( हर्षातिरेकानें ) मावशी, मावशी, व्हेअर शाल आय् पुट यू !

[ चतुर्भुज येतो.

**मावशी :** बरे आलांत चतुर्भुज. तुमचीच आठवण केली मीं आतां. वैदिक पद्धतीनं झटपट लग्न लावणारा तो कोण माणूस आहे म्हणून तुम्हीं म्हणत होता ?

**चतुर्भुज :** तो आपला ओके शास्त्री. कां ? मिळाली माझ्यासाठीं एखादी मुलगी ?

**मावशी :** तुमच्यासाठीं नाहीं हो ! यांच्यासाठीं म्हणतें आहें मी.

**चतुर्भुज** ! म्हणजे—यांचं—

**घोडके :** ( त्याला मिठी मारून ) ठरलं दोस्त ! आज संध्याकाळीं आमचं पाणिग्रहण होणार !

**मावशी :** ओरडूं नका तुम्ही इथं ! बाहेर चला. मी सांगतें तुम्हांला काय करायचं तें.

[ ते सारे बाहेर जातात. डोळ्यांतून अश्रू वहात असलेले काका एकदम बाहेर येतात आणि प्रभातच्या खोलीच्या दाराशीं जातात

**काका :** कारटे, काय—केलंस काय तूं हें ! त्या बोड[illegible]
मागल्या दारच्या विहिरींत उडी कां मारीत नाहींस !

**प्रभात** : ( आंतून वेगानें येते आणि काकांच्या गळयास मिठी मारते ) काका–

**काका** : ( त्वेषानें ) हात लावूं नकोस माझ्या अंगाला ! जा–लग्न कर त्या खेचराशीं अन् त्याच्या पाठीवरच्या पैशाच्या गोण्याशीं–आणि मर कुठं तरी जाऊन तडफडून ! तुझं तोंड पाहण्याची मला इच्छा नाहीं. ( तिला खोलींत ढकलतो. ) या हडळीनं माझ्या आयुष्याचा जसा नाश केला तसं ती तुझ्या आयुष्याचं वाटोळं करील, तेव्हां तिचं समाधान होईल ! पण तें पाहायला रहातोंय कशाला मी या घरांत ! चाललों हा—

[ जाऊं लागतो तोंच समोरून मावशी येते. काकांचे शब्द ऐकून ती एकदम भडकते.

**मावशी** : ( रागानें ) चाललों मी ?–कुठं चाललांत ?

**काका** : ( ओरडून ) मरायला ! ( मावशी सर्दच होते. काकांचें हें रौद्र स्वरूप तिनें आतांपर्यंत कधींच पाहिलेलें नसतें. ) आतांच्या आतां त्या बनेश्वराच्या डोहांत जाऊन मी जीवच देतों ! मी मेलों म्हणजे मग त्या पोरीचा तुला काय गळा कापायचा असेल तो खुशाल काप आणि तिला बळी देऊन टाक त्या म्हसोबाला !

**मावशी** : हो, हो, समजलं बरं ! मरायचं आहे ना तुम्हाला ? जा खुशाल मरा– पण आजच्या दिवस तरी मरूं नका ! आज संध्याकाळीं त्या पोरीच्या डोक्यावर अक्षता पडायच्या आहेत तोंपर्यन्त माझ्या कपाळाचं हें कुंकू राहूं द्या म्हटलं शिल्लक—

[ काका दातओंठ खात रागानें निघून जातात.

**प्रभात** : ( खोलीच्या दारांतून ) अग, अडव त्यांना—

**मावशी** : तें काय म्हातारं मरतंय ! येईल आत्तां परत !

# [ ३ ]

चंडोलच्या खोलीबाहेरची ग्यालरी. चंडोल तावातावानें प्रवेश करतो. त्याच्या हातांत एक पत्र आहे. त्याचा एक हात नीरा ओढीत आहे. तिच्या मागून चंदूही येते !

**चंडोल** : तुम्ही मला अडवूं नका, नीराबाई ! यापुढें मी जिवंत राहणं शक्य नाहीं ! या पत्रानं माझ्या जखमी जिवाच्या अगदीं ठिकऱ्या ठिकऱ्या करून टाकल्यात !

**नीरा** : पण मी काय म्हणतें तें ऐका तर खरं—

**चंडोल** : तुम्ही काय वाटेल तें म्हणालांत तरी माझा निश्चय मी बदलणार नाहीं. हॅम्लेटच्या पलीकडच्या अवस्थेंत मी गेलों आहें. त्याला जगावं का मरावं याचा लांब लांब भाषणं करून विचार करावा लागला. माझा आत्महत्त्येचा निश्चय हें पत्र वाचलं न् एकदम ठरला !

**चंदू** ( रडत रडत ) असं रे काय करतोस मामा ? आई, आत्महत्त्या म्हणजे काय ग !

**चंडोल** : मी सांगतों तुला. ( कठोरपणें ) आत्महत्त्या म्हणजे जीव द्यावयाचा-मरायचं-मरून जायचं—

**चंदू** : म्हणजे देवाकडच जायचं ना ?

**चंडोल** : कोणास ठाऊक देवाकडे का राक्षसाकडे !

**चंदू** : तर तर, तुला जाऊन देतें राक्षसाकडे ! अशा झिंज्या ओढून धरीन तुझ्या-

[ हंसते. नीरालाही हंसूं आवरत नाहीं.

**चंडोल** : ( चिडून ) हंसा-हंसा ! सारं जगच मला हंसतंय ! मग तुम्हांला हंसायला काय हरकत आहे ? पण मी रहातोंच कशाला या जगांत !

**नीरा** : असा अविचार करण्यांत काय अर्थ आहे, चंडोल ? आजपर्यंत तुमच्या-पेक्षां जास्त दुःख जगांत कोणाला झालंच नसेल का ? म्हणून त्या सगळ्यांनींच काय आत्महत्त्या केल्या ?

**चंडोल** : जगापेक्षां मी फार निराळा आहें, नीराताई ! मी कांहीं देहानं जगणारा माणूस नाहीं. काव्य हाच माझा प्राण आहे. भावना हेंच माझं जीवन आहे. स्फूर्ति हाच माझा विश्वास आहे. या माझ्या काव्याच्या सामर्थ्यावर साऱ्या जगाला जिंकून मी त्याला माझ्यां पायांशीं लोळण घ्यायला लावीन अशी आजपर्यंत मला घमेंड वाटत होती. पण तो माझा आत्मविश्वास आतां ढांसळला, पार ढांसळला. माझ्या जीवनांतलं काव्यच तिनं नाहींसं करून टाकलं. आतां हीं नुसतीं देहाचीं ढेकळं घेऊन मीं कसा जगूं ! नाहीं, नीराताई, आत्महत्त्या केल्यावांचून मला दुसरा मार्गच नाहीं ! मला अडवूं नका—

[ जाऊं लागतो. तोंच तिकडून काका येऊन त्याला अडवतात. त्यांच्या एका काखोटींत गांधी टोपी आहे, आणि दुसऱ्या खांद्यावर उपरणें लोंबतें आहे.

**काका :** चल हट मागं ! आत्महत्त्या करायला निघालो ! जो उठतो तो आपला आत्महत्त्या करायला निघतो. मी आत्महत्त्या करायला निघालों. हा आत्महत्या करायला निघाला. अन् त्या पोरीनं तर जवळ जवळ आत्महत्त्या केल्यासारखीच आहे. छे ! छे ! छे ! आमची महिषासुरमर्दिनी एकंदर किती लोकांच्या प्राणांचे बळी घेणार आहे कोणास ठाऊक !

**चंडोल :** म्हणजे तुम्ही देखील माझ्याप्रमाणें आत्महत्त्या करायला निघालांत– काकासाहेब !

**काका :** निघालों होतों. आतां नाहीं. आत्महत्त्या करायचा विचार मीं सोडून दिला !

**नीरा :** दिलांत ना ? छान केलंत ! ( चंडोलला ) बघा, ऐका यांचं !

**काका :** छे, छे ! आत्महत्त्या करणं म्हणजे काय सोपं काम आहे. जीव द्यायला म्हणून तावातावानं मी त्या नदीच्या डोहावर गेलों आणि त्या डोहांतलं तें काळंभोर पाणी पाहिलं–महाराज ! अशी काय बोबडी वळली माझी म्हणतां ! पळालों मागल्यामागं अन् काय ! कसचा जीव देतों अन् काय करतों ? त्या वेळीं मीं निश्चय केला कीं यापुढें प्राण गेला तरी जीव द्यायचा नाहीं.

**चंडोल :** पण आत्महत्त्येचा विचार करण्याचं तुम्हाला काय कारण ?

**काका :** मला काय कारण ? आज त्या पोरीचं त्या बोडक्याशीं लग्न लागलेलं या डोळ्यांनीं पहायला त्या घरामध्यें मीं जिवंत राहीन असं का तुला वाटतं ?

**चंडोल :** ( उसळून ) काय म्हणतां ? आज त्यांचं लग्न आहे !

**काका :** आज आतां गोरज मुहूर्तावर ! म्हणजे आणखी एक तासानें त्यांच्या डोक्यावर अक्षता पडतील ! आमच्या बायकोच्या अंगांत आज डेक्कन क्वीन संचारली आहे. त्या पोरीला शेवटच्या स्टेशनावर पोहोंचवून तिचा निकाल लावील तेव्हां ती थांबेल !

**चंडोल :** मग मी असाच्या असा तिथं जातों आणि तुमच्या बंगल्याच्या दारासमोर डोकं आपटून प्राणच देतों.

**काका :** मूर्ख आहेस ! तूं तिथं जाऊन डोकं आपटलंस म्हणून तें लग्न थांबेल होय ? तूं आमच्या बायकोला अन् त्या बोडक्याला अजून ओळखलं नाहींस ! अरे, त्यांना काय 'हॉर्ट' आहे ? मी जीव द्यायला घरांतून बाहेर पडलों म्हणून ती कांहीं माझ्या मागं धांवून आली नाहीं ! उलट मलाच म्हणतें, मरायचं असेल तर

आज मरूं नका–उद्यां मरा! आतां यावेळीं तिकडे शेरभर कुंकवाचा मळवट डोक्याला फांसून टणाटणा नाचत असेल सटवाई! म्हणून म्हणतों, तूं हा विचार सोडून दे. म्हणजे त्या दोघांचं लग्न लागायचं तें लागेलच अन् तूं मात्र फुकट मधल्यामधें मरशील!

**नीरा :** पण मी म्हणतें काकासाहेब, त्या मुलीला नसेल यांच्याशीं लग्न करायचं तर हा तिच्या मर्जीचा प्रश्न आहे. पण तेवढ्यासाठीं यांना डोक्यांत राख घालून स्वतःच्या जिवाचा घात करण्याचं काय कारण आहे?

**काका :** अगदीं बरोबर आहे तुमचं म्हणणं. अहो, याचा तर कशालाच कांहीं पत्ता नाहीं. याला संसारांतील दुःख काय माहित असणार? पण मी माझ्यावरून सांगतों. माझी पहिली बायको मेली, पण मीं आत्महत्त्या केली नाहीं. उलट पुन्हा दुसरं लग्न केलं. बरं, ती दुसरीही बायको मेली, तरीही मीं आत्महत्त्या केली नाहीं. आतां ह्या तिसऱ्या बायकोनं इतकीं वर्षं माझा छळ चालविला आहे. तरी देखील अजून मीं आत्महत्त्या केली नाहीं म्हटल! उलट ती आतां मेली तर आणखी पंचवीस वर्षं मी जास्तच जगेन!

**चंडोल :** प्रेम म्हणजे काय आहे तें तुम्हां जुन्या लोकांना माहीत तरी आहे का काकासाहेब?

**काका :** हें बघ ए कवि, हें प्रेम, काव्य, हृदयभंग, आत्महत्त्या हा सगळा किनई तुम्हां अलिकडच्या नादान तरुणांचा निव्वळ चावटपणा आहे! काय रे, प्रेम प्रेम म्हणून तुम्ही हल्लींचे तरुण किंकाळ्या मारीत असतां, तुमची अशी कल्पना आहे होय रे, कीं आम्हां जुन्या लोकांना प्रेम म्हणजे कांहीं माहितच नव्हतं आणि, कोलंबसानं अमेरिकेचा शोध जसा लावला तसा प्रेमाचा पहिल्यान्दा शोध जसा कांहीं तुम्हींच आतां लावला!

**चंडोल :** काय वाटेल तें तुम्ही म्हणालांत तरी माझा आत्महत्त्येचा निश्चय मीं आतां बदलणं शक्य नाहीं.

**नीरा :** पाहिलंत, किती माथेफिरू आहेत हे?

**काका :** तुम्ही थांबा! मी याला ताळ्यावर आणल्यावांचून रहात नाहीं. हें पहा, आत्महत्त्या करणं हें पाप आहे असें आपल्या धर्मांत सांगितलं आहे हें तर तुला मान्य आहे ना? खुद्द भगवंतांनींच गीतेमध्यें सांगितलें आहे कीं, 'नको नको बेट्या, करूं आत्मघात! जाशील नरकांत फुकाफुकी!' आत्महत्त्या करणारा

माणूस नरकांत जातो–नरकांत! नरक म्हणजे काय हें माहीत आहे का तुला? अरे, एक दिवस तूं तिथं राहणं शक्य नाहींस. काय चेष्टा आहे काय? इथं परवां भंग्यांनीं संप केला तर नको नको जीव झाला आपल्याला!

**चंडोल** : कशाला तुम्ही मला सांगतांय त्या स्वर्गाच्या न् नरकाच्या गोष्टी! धर्मावर माझा विश्वास नाहीं!

**काका** : ( रागावून ) धर्मावर तुझा विश्वास नाहीं! धर्मावर तुझा विश्वास नाहीं? मग मर–आत्तांच्या आत्तां मर–मुळींच थांबूं नकोस! ( नीराला ) बाई, अफू, विष, गळफांस, सुरी, काय तुमच्या जवळ इथं असेल तें सगळं टाका याच्यापुढं आणि याला मरूं द्या लेकाच्याला!

**चंडोल** : तुमच्याप्रमाणं मी देखील घाबरून आत्महत्त्या करणार नाहीं अशी तुमची समजूत आहे काय?

**काका** : आत्महत्त्या करणारा माणूस असा शंख करीत नाहीं तुमच्या आमच्या-सारखा. परवां आमच्या घराशेजारीं एका माणसानं आत्महत्त्या केली. वा रे वा, अशा सफाईनं की या कानाचा त्या कानाला पत्ता लागला नाहीं.

**चंडोल** : मी असा उंदरासारखा मरायचा नाहीं बिळांत जाऊन! साऱ्या जगाला गदगदा हलवीन तेव्हां मरेन! व्हा बाजूला, जाऊं द्या मला—

**काका** : ( त्याला धक्का देऊन मागें सारीत ) थूः तुझ्या जिनगीवर लेका! यःकश्चित् एका पोरीसाठीं मरतोस! तुला मरायचं असेल तर देशासाठीं मर–राष्ट्रासाठीं मर–असं मरण मर कीं त्या मरणानं सारं राष्ट्र जिवंत झालं पाहिजे! तुला मरायचं होतं तर त्या बेचाळीसच्या लढ्यांत लहान पोरं मेलीं त्या वेळीं तूं कां मेला नाहींस? त्या वेळीं तूं कां बसला होतास प्रेमाचीं रंडागीतं खरडीत? 'करा नाहीं तर मरा' असं महात्मा गांधींनीं जेव्हां देशाला सांगितलं त्या वेळीं तूं मेला असतास तर, लेका, आज अमर तरी झाला असतास! ( चंडोल एकदम स्तिमित होतो. ) काय रे, प्रेमभंग झाला कीं आत्महत्त्या केली पाहिजे हें तूं कुठं शिकलास! तो लैला–मजनू सिनेमा बघून होय? त्या तसल्या भ्याड प्रेमाला जग कवडीचीही किंमत देत नाहीं! मोठं प्रेम करायला छातीही मोठी लागते. त्या शहाजहान बादशहासारखी! मुमताज मेल्यानंतर त्यानं आत्महत्त्या केली नाहीं! उलट वीस वर्षे तो धैर्यानं जिवंत राहिला आणि त्यांनीं तिच्यावर ताजमहाल बांधला! असा काव्याचा ताजमहाल बांध तुझ्या प्रेमभंगावर! म्हणजे जगाला कळेल तरी तुझं प्रेम केवढं मोठं होतं तें!

**चंडोल :** ( मंत्रमुग्ध होऊन ) बोला-काका, आणखी बोला-एकसारखे बोलत रहा-

**काका :** अरे, तुझ्यासारख्या कवीला जगण्यासारख्या शेंकडो गोष्टी आहेत या जगांत! वर आभाळांत बघ. सूर्य आहे, चंद्र आहे, ढग आहेत, चांदण्या आहेत. एकेका चांदणीसाठीं एकेक वर्ष जगलास तरी अमर होशील! वर बघायचं नसेल तर नको बघूंस! खालीं जगांत बघ. शेंकडो गरीब आहेत. मजूर आहेत. हरिजन आहेत. अनाथ आहेत. भुके आहेत. दुःखी आहेत. या सर्वांचीं गाऱ्हाणीं तूं जगाला सांगणार नाहींस तर कोण सांगणार? डोळे उघड, जागा हो, तो स्वराज्याचा तिरंगी झेंडा दिल्लीच्या तक्तावर फडकायला लागला आहे बघ! त्याचे पोवाडे आतां तूं गाणार नाहींस तर कोण गाणार?

[ चंडोल एकदम काकांचे पाय धरतो.

**चंडोल :** नाहीं, काकासाहेब, मी मरणार नाहीं-मी जगणार-मी जगणार! आणि आजन्म अविवाहित राहून माझं सारं आयुष्य मी देशासाठीं खर्च करणार!

**काका :** ( त्याला उठवीत ) ऊठ, ऊठ! आतां मात्र तूं खरा कवि शोभतोस!

**चंडोल :** काकासाहेब, खरोखरीच तुम्हीं मला आज नवीन जीवन दिलंत!

**काका :** त्याचं कारण ठाऊक आहे का तुला? त्याचं कारण मला स्वतःलाच आज नवीन जीवन मिळालं आहे! त्या कैदाशिणीच्या कचाट्यामधून आजच प्रथम माझी सुटका झाली. म्हणून बृहस्पतीसारखं मी हें सारं बोलूं शकलों. कुठलं काय डोक्यांत भरून ठेवलं होतं आतांपर्यंत, तें तोंडांतून एकदम फटाफट बाहेर आलं! मला आठवत देखील नाहीं मी काय बोललों तें! एवढ्यासाठीं माणसाला स्वातंत्र्य पाहिजे.

**चंडोल :** तुमच्या भाषणानं माझं डोकं एकदम साफ झालं. द्वेष, राग, मत्सर, सूड, असूया पार नाहींशीं झालीं आतां माझ्या डोक्यांतून! सारं विश्व मला आतां प्रेममय वाटूं लागलं. चला काकासाहेब, प्रभातच्या लग्नाला आपण हजर राहूं आणि तिच्यावरचं आपलं प्रेम किती शुद्ध आणि निर्हेतुक आहे तें साऱ्या जगाला दाखवूं!

**काका :** वा रे पठ्या! तूं तर माझ्यावर ताण केलीस! चल, आपली तयारी आहे.

[ जाऊं लागतात.

**नीरा :** थांबा काकासाहेब, मलं तुमच्याशीं बोलायचंय!

**काका :** ( चंडोलला ) तूं हो पुढं. मी आलोंच!

[ जातात. पडदा उघडतो.

## [ ४ ]

प्रभातचा दिवाणखाना. दिवाणखान्यामधलें पूर्वीचें सगळें सामान हलविलेलें असतें. फुलांच्या माळा मात्र छताला लागलेल्या आहेत. पडदा उघडतो. तसा चतुर्भुज प्रवेश करतो. त्याच्या मागोमाग ओकेशास्त्री येतो.

**चतुर्भुज** : या शास्त्रीबुवा. मावशी-( मावशी बाहेर येतात. त्यांनीं लग्नासाठीं थाटाचा पोषाख केलेला असतो. ) हेच ते ओकेशास्त्री.

**मावशी** : शास्त्रीबुवा, झटपट आटपलं पाहिजे हं !

**ओकेशास्त्री** : ओ के ! अगदीं इतक्या झटपट आटपतों कीं नवरानवरीला आपलं लग्न कधीं लागलं हें देखील कळायचं नाहीं !

**चतुर्भुज** : सामान काय पाहिजे तुम्हांला ?

**ओकेशास्त्री** : सामान होय ! सामान दोन पाट, एक शालजोडी, दोन फुलांचे हार, अक्षता,-आणखी काय पाहिजे बरं ? हो, एक नवरा आणि एक नवरी ! एवढं असलं म्हणजे ओ के. ( चतुर्भुज कागदावर लिहून ठेवतो. ) लिहून काय ठेवतां तुम्ही चतुर्भुज ?

**चतुर्भुज** : माहिती जमवून ठेवतोंय एव्हांपासून—

**मावशी** : अरे माळी—

**चतुर्भुज** : माळी कशाला ? मी आणतों आंतून सामान.

[ आंत जातो आणि पाट घेऊन बाहेर येतो.

**ओकेशास्त्री** : देवक तुम्हीच बसवणार ना ?

**मावशी** : हो, पण ह्यांचा अजून पत्ता नाहीं. चतुर्भुज, अहो, दुपारपासून हे बाहेर गेलेत. कांहीं एखादी कमीजास्ती बातमी तर ऐकली नाहींत तुम्हीं !

**चतुर्भुज** : नाहीं बुवा ! कां ?

**मावशी** : मग हरकत नाहीं.

**ओकेशास्त्री** : बायको नसली म्हणजे सुपारी कमरेला लावून देवक बसविण्याची जशी सोय आहे तसा नवरा गैरहजर असला तर हातांत नारळ घेऊन स्त्रीलाही देवकं बसवितां येईल अशी आमच्या पद्धतींत सोय आहे.

**मावशी** : पण देवक नाहींच बसविलं तर ?

**ओकेशास्त्री :** ओ के ! तीही आमच्या पद्धतींत सोय आहे.

**मावशी :** मग तसंच करा.

**ओकेशास्त्री :** ओ के ! ( हातांतल्या घड्याळाकडे पाहून ) गोरज मुहूर्ताला अजून पंधरा मिनिटं अवकाश आहे. तोंपर्यन्त आम्हाला दोन कप फर्स्ट क्लास चहा पाहिजे.

**चतुर्भुज :** तुम्ही आंत या शास्त्रीबुवा माझ्याबरोबर. मी तुमची सगळी सोय करतों.

[ दोघे आंत जातात. मावशी हातांत घडी करून ठेवलेला चेकचा कागद उलगडून पहाते, आणि स्वतःशींच हंसते.

**मावशी :** ( बाजूच्या एका दारापाशीं जाऊन ) नाथसाहेब, बाहेर या ना ! इतका वेळ आंत काय करतां ?

[ एका हातांत व्हिस्कीचा ग्लास आणि दुसऱ्या हातांत सोड्याची बाटली घेऊन घोडके आंतून येतो. त्यानें मलमलच्या सदऱ्यावर जरीचें जाकीट घातलें आहे आणि डोक्याला जरीची टोपी घातली आहे. त्याच्या गळ्यांत फुलांचा मोठा हार आहे आणि हातांत गजरे आहेत.

**घोडके :** ( सोडा ओतीत ) हें पाणिग्रहण करतों आहें !

**मावशी :** ( जवळ जाऊन ) हें काय ? ( घोडके तिला वास देतो, त्याबरोबर मागें सरते ) दारू कीं काय ?

**घोडके :** दारू नाहीं, व्हिस्की ! स्कॉच आहे ! मिळत नाहीं ही हल्लीं. काळ्या बाजारांतून आणली आहे ही साठ रुपयांला एक बाटली.

**मावशी :** पण आतां ह्याच्यावांचून कांहीं अडलं आहे का ? कोणी आलं तर काय म्हणेल ?

**घोडके :** आतां आपण कोणाच्या बापाला भीत नाहीं मावशी. येऊं द्या कोणाला यायचंय तें ! अहो, आजच्या आनंदाच्या प्रसंगीं हें घ्यायचं नाहीं तर मग काय साबुदाण्याची लापशी घ्यायची ? ( ग्लास मावशीच्या पुढें करून ) घेतां कां थोडंसं ?

**मावशी** ( दूर सरत ) चला.

**घोडके :** तुमच्या चेहऱ्याकडं पाहिलं कीं मला हंसूंच येतं मावशी ! ( स्वतःशींच

हंसतो.) मला मुळीं खरंच वाटत नाहीं कीं यू आर माय सासू आणि आय ॲम यूवर जांवई!

[ आणखी मोठ्यानें हंसतो.

**मावशी** : (हातांतल्या चेकचा कागद दाखवीत) या कागदाचं काय करायचं म्हणतां?

**घोडके** : त्या चेकचं होय? तो उद्यां सकाळीं अकरा वाजतां बँकेंत नेऊन द्यायचा आणि पंचवीस हजार रुपये बँकेकडून रोख घ्यायचे.

**मावशी** : पण ते देतील ना मला पैसे?

**घोडके** : त्यांचा बाप देईल! माझी सही आहे ना त्याच्यावर. माझ्या सहीची किंमत तुम्हाला माहित नाहीं मावशी. कुठल्याही चिठोऱ्यावर माझी सही घ्या आणि शंभर रुपयांची नोट म्हणून ती बाजारांत वापरा. (पितो.) बस, आज आपण खूप आहोंत स्वतःवर! आपल्या आयुष्यांतली सारी ॲंब्यूलन्स आज पूर्ण झाली!

**मावशी** : नेहमीपेक्षां कांहीं तरी निराळेच दिसतां आहांत तुम्ही मला आज. आटपा आतां हें लौकर. मी आलेंच आंतून जाऊन.

**घोडके** : थांबा हो, जातां कुठं? मला तुमच्याशीं बोलायचंय. पुष्कळ बोलाचंय. (पितो.) खरंच सांगू मावशी, आज तुमच्याबद्दल मला कांहीं निराळंच वाटूं लागलं आहे. खरंच, तुम्ही होता म्हणून हें सारं जुळलं! तुमचे उपकार कसे फेडावे हेंच मला कळत नाहीं!

**मावशी** : एवढं तुम्ही म्हणालांत तरी पुष्कळ आहे! नाहीं तर लग्न लागल्यावर तुम्हीं अन् ती एक व्हाल आणि द्याल या बिचाऱ्या मावशीला घरांतून हांकलून!

**घोडके** : काय बोलतांय–काय बोलतांय तुम्ही हें मावशी? तुम्हांला या घोडक्याचं अंतःकरण माहिती नाहीं! (छातीला हात लावून मावशी पुढें जात) बघा, हात लावून बघा–लाजूं नका–किती मऊ आहे तें! मी तुम्हांला हांकलून देईन? छे, छे, छे, असं कसं बोलतां मावशी? मीं तर निश्चय केलाय कीं जन्मभर तुम्हाला म्हणून सोडायचं नाहीं! मग हें लग्न होवो अगर न होवो.

**मावशी** : (दचकून) म्हणजे?

**घोडके** : कसं सांगू मी तुम्हांला मावशी? किती–किती म्हणून मला वाटतं

तुमच्याबद्दल ! मला तें शब्दांत बोलून दाखवतां येत नाहीं. मी कांहीं कवी नाहीं त्या ह्याच्यासारखा. इकडे जवळ या. मी तुमच्या कानांत सांगतों—या, लाजूं नका.

[ मावशी भीतभीत जवळ येते, तोंच घोडके मावशीच्या मानेभोंवतीं हात घालून तिला जवळ ओढण्याचा प्रयत्न करतो. मावशी ताडकन् त्याचा हात झिडकारून दूर होते.

**मावशी** : ( रागानें ) घोडके !

**घोडके** : ( हंसून ) किती छान लाजलांत तुम्ही मावशी ! पुन्हां एकदां लाजा—पुन्हां एकदां लाजा—

[ तिच्या जवळ जवळ जाऊं लागतो.

**मावशी** : दुरून बोला—

**घोडके** : रागावतांय कशाला तुम्ही मावशी ? रागावूं नका. या आनंदाच्या प्रसंगीं असा विरस करूं नका बुवा ? ( पिऊन ) खरंच सांगा, मी तुम्हाला आवडतों कीं नाहीं.

**मावशी** : दारू प्यालाहांत तुम्ही घोडके ! शुद्धीवर या—

**घोडके** : दारू पिऊन शुद्धीवर रहायचा मला सराव आहे मावशी. माझी तुमच्याविषयींची कल्पना अगदींच निराळी होती. फारच रुक्ष दिसतांय तुम्ही ! आतां एवढी आपली दोस्ती झाल्यावर—

**मावशी** : मी तुमची सासू आहें घोडके—आई आहें—थोरली बहीण आहें—

**घोडके** : ही ही आमली नुसती बोलायची भाषा असते. ते नाटकामधले लोक असं बोलतात ! तुम्ही आई आहांत असं म्हणालांत म्हणून मी कांहीं तुमचा मुलगा होत नाहीं; आणि बहीण म्हणालांत म्हणून मी कांहीं तुमचा भाऊ होत नाहीं. आणि—आणि मी तुम्हांला मावशी म्हणतों आहें म्हणून मी कांहीं तुमचा भाचाही होत नाहीं. ( मोठ्यानें हंसतो. ) असं काय करतांय मावशी ? या ना इकडे. इतक्या अनुभवी तुम्ही. नव्या नवरीसारख्या अशा लाजतांय काय खुसूखुसू ?

[ मावशी दरवाजाकडे धांव घेते. तोच घोडके तिचा हात पकडून तिला ओढून आणतो आणि आंतलें दार लावून घेतो.

**घोडके** : आतां सांपडलांत कीं नाहीं ! तसा मी नाहीं जाऊन द्यायचा तुम्हाला ! भाचीच्या लग्नांत मावशीच्या अंगाला नको का थोडीशी हळद लागायला ?

**मावशी** : घटकेनं होणाऱ्या बायकोच्या मावशीशीं अशी हलकट भाषा करायला तुम्हाला लाज कशी वाटत नाहीं ?

**घोडके** : ( हंसून ) आणि भाचीच्या होणाऱ्या नवऱ्याशीं वाटेल तशी अंगलगट करून त्याच्याकडून शेंकडो रुपयांच्या देणग्या उपटतांना तुम्हाला आजपर्यंत कशी शरम वाटली नाहीं ? टाका माझ्या ह्या वस्तू ! ह्या अंगठ्या, या बांगड्या, ही माळ, अन् हा–हा शालू देखील—

**मावशी** : तूं आपखुषीनं दिलेल्या या देणग्या आहेत—

**घोडके** : मग मी तरी तुझ्याजवळ दुसरं काय मागतों आहें ? नुसती देणगीच.

[ जवळ जातो.

**मावशी** : आजपर्यंत मी तुझ्याशीं मनमोकळेपणानं वागलें म्हणून तूं मला काय तसली बायको समजतोस ? माझ्या अंगाला हात तर लाव पुन्हां, चावा घेईन तुझ्या नरडीचा ! मी वाघीण आहें वाघीण !

**घोडके** : अग जा जा ! तुझ्यासारख्या अशा छपन्न वाघाच्या मावशा पाहिल्या आहेत मीं आतांपर्यंत ! फुकट पाहिजे काय तुला हें सगळं ? आणखी एवढंही करून तुला पंचवीस हजार रुपये पाहिजेत वर ! तुझ्या काकानं ठेवले आहेत पंचवीस हजार रुपये !

**मावशी** : माझ्याजवळ हा चेक आहे तुझ्या सहीचा. उद्यां बँकेंत जाऊन सारे पैसे मी वसूल करून आणीन. सोडायची नाहीं—

**घोडके** : खुशाल बँकेंत घेऊन जा तो चेक. माझ्या खात्यांत पांच रुपये बारा आणे शिल्लक आहेत. बोंबलत येशील परत. ( विकट हंसून ) तूं काय मला मूर्ख समजलीस ? आय् इज धी बिझीनेस मॅन् ! माझ्या अकलेचं कांहीं पापड अन् लोणचं झालं नाहीं.

**मावशी** : ( मूढ होऊन ) म्हणजे या चेकचे पैसे मिळणार नाहींत मला ? इतका नीच राक्षस आहेस तूं ! ( घोडके मोठ्यानें हंसतो. ) मग लक्ष्यांत ठेव, आज तुझं हें लग्न लागणार नाहीं !

**घोडके** : माझं लग्न लागायला आतां तुमची जरूरी नाहीं मावशीबाई ! तिकडे मुलगी आहे–भट आहे–अक्षता आहेत–सगळं कांहीं आहे. तुम्ही बसा त्या खोलींत जाऊन—

**मावशी :** प्राण गेला तरी मी हें लग्न होऊं देणार नाहीं !

**घोडके :** ( दांत ओंठ खाऊन ) अस्सं ? मग कसं लग्न होत नाहीं तें मी पाहतोंच ! हो–हो चालती त्या खोलींत ! नाहीं तर मान मोडतों तुझी. ( तिला पकडायला जातो. ) भाचीला विकून पैसे मिळवते आहे साली !

[ मावशीची मान पकडतो. दोघांची धडपड होते.

**मावशी :** ( मोठ्यानें किंचाळत ) मेले–मेले–धांवा–वांचवा–( प्रभात, चतुर्भुज, ओकेशास्त्री आंतून धांवत येतात. घोडके मावशीला सोडून देतो. मावशी प्रभात जवळ जाऊन ) प्रभात, हा माणूस हलकट आहे–पाजी आहे–दारुड्या आहे–उलट्या काळजाचा राक्षस आहे ! माझा हात धरून यानं माझी अब्रू घेण्याचा आतां प्रयत्न केला !

**घोडके :** ( मोठ्यानं ओरडून ) साफ खोटं आहे हें ! ( प्रभातला ) या माझ्यावर अशा कां उलटल्या याचं कारण मी तुम्हाला सांगतों. ( मावशीच्या हातांतला चेक हिसकावून घेऊन ) हा: चेक बघा. पंचवीस हजार रुपयांचा आहे. हें लग्न ठरविल्याबद्दल ह्यांनीं ही माझ्याकडून जबरदस्तीनं लांच घेतली आहे !

[ प्रभातच्या हातांत चेक देतो.

**प्रभात :** ( चेक पाहून त्वेषानें ) मावशी—

**मावशी :** मीं माझ्यासाठीं घेतला नाहीं हा चेक प्रभात !

**घोडके :** मीं ह्यांना साफ सांगितलं कीं या चेकचे पैसे मी तुम्हांला देणार नाहीं म्हणून ! लांच देऊन मला हें लग्न करायचं नाहीं—

**प्रभात :** नका सांगूं तुम्ही. आलं माझ्या ध्यानांत. मावशी, आतां मेहेरबानगी कर आणि जा इथून. भटजी, मी तयार आहें लग्नाला.

**मावशी :** मी पाया पडतें तुझ्या प्रभात. ह्या माणसाशीं तूं लग्न लावूं नकोस. नाश होईल तुझा. ऐक माझं.

**प्रभात :** ( संतापानें ) गप बसतेस कीं नाहीं तूं आतां ! ह्यांच्याशीं लग्न लावायला आधीं तूं मला सांगितलंस. आणि आतां तूंच म्हणतेस कीं यांच्याशीं लग्न लावूं नको म्हणून ! तुझ्या बडबडीच्या वाटेल त्या तालावर नाचणारी मी काय कळसूत्री बाहुली आहें होय ? आजपर्यंत माझा आयुष्याचा नाश केलास तेवढा पुरे नाहीं का झाला ? आतां कर काळं इथून–हो चालती—

**घोडके :** गेट आऊट ! शास्त्रीबुवा, बघतां काय ! करा मंगलाष्टकांना सुरवात.

**ओकेशास्त्री :** ओ के ! चला, हे हार घ्या. ( घोडके आणि प्रभातच्या हातांत हार देतो. ) चतुर्भुज, धरा अंतरपाट ! ( दोघे अंतरपाट धरतात. ) बोला— शुभ मंगल सावधान—लक्ष्मी कौस्तुभ—

[ मावशी खालीं बसून एकदम मोठ्यानें गळा काढते. प्रभात आपले कान हातांनीं दाबून घेते. इतक्यांत काका आणि चंडोल येतात.

**काका :** अरे, थांबा थांबा, आम्हांला येऊं द्या—

**मावशी :** ( आनंदानें उठून ) वेळेवर आलांत तुम्ही ! थांबवा हें लग्न. शास्त्रीबुवा, मंगलाष्टकं म्हणूं नका ! अंतरपाट काढून टाका—

[ ओके शास्त्र्यांच्या हातांतला अंतरपाट हिसकावून घेते.

**काका :** म्हणजे ही काय भानगड आहे ?

**प्रभात :** मी सांगतें तुम्हांला ! ह्यांचं आणि माझं लग्न जमविण्यासाठीं मावशीनं पंचवीस हजार रुपयांची ही लाच घेतली ह्यांच्यापासून.

[ त्यांना चेक दाखविते.

**काका :** ( संतापून ) काय म्हणतेस ? पंचवीस हजार रुपयांची लाच घेतली या सटवीनं !

**मावशी :** पण माझं ऐका तर तुम्ही—

**काका :** आतां एक शब्द बोलशील तर शिवी देईन भयंकर—

**घोडके :** एवढंच नव्हे, तर काकासाहेब, आतांपर्यंत शेंकडों रुपयांचे दागिने आणि देणग्या उपटल्या आहेत ह्यांनीं माझ्यापासून. ह्यांच्या अंगावरच्या ह्या एकूण एक वस्तू माझ्या आहेत.

**काका :** पैसे घेऊन पोरीचा हा लिलांव केलास होय राक्षशिणी ? एवढा पैशाचा अन् दागिन्यांचा लोभ तुला आला कोठून ? आयुष्यांत कोणत्या गोष्टीची तुला कमतरता आहे ? पोर ना बाळ तुला ! कशाला पाहिजे होते ग तुला हे पैसे ? घरांत भाचीची एवढी संपत्ति कुजून चालली आहे. कां तुला आठवली ही असली अवदसा ?

**मावशी :** ( काकांचे पाय धरून ) मी पाया पडतें तुमच्या. माझी चूक झाली. मला क्षमा करा. पण हें लग्न होऊन देऊं नका !

**काका :** तूं नको म्हणतेस ना ? मग हें लग्न होणार ! जरूर होणार ! प्रभात, तुला पसंत आहे ना हें ?

**प्रभात :** ( मान खालीं घालून ) होय.

**काका :** मग ठीक. शास्त्रीबुवा, धरा अंतरपाट अन् करा सुरवात.

**घोडके :** थँक यू, काकासाहेब !

[ ओकेशास्त्री आणि चतुर्भुज पुन्हां अंतरपाट धरतात.

**ओकेशास्त्री :** शुभ मंगल सावधान !

**काका :** थांबा शास्त्रीबुवा. तो अंतरपाट बाजूला काढा. आणि चंडोल, तुम्ही पोलिसाला बोलवून आणा.

**घोडके :** ( घाबरून ) पोलिसाला ?

**काका :** हो, पोलिसाला ?

**घोडके :** पोलिसाचं काय काम ?

**काका :** त्याशिवाय तूं कसा चतुर्भुज होशील ! हरामखोर, पहिली बायको जिवंत असतांना आम्हांला फसवून आमच्या मुलीचा गळा कापतोस होय ?

[ सारे आश्चर्यचकित होतात.

**घोडके :** साफ खोटं आहे ! माझी बायको जिवंत नाहीं !

**काका :** अस्सं ? नीरा, बाहेर ये. ( एका बाजूच्या खोलींतून नीरा आणि चंदू येतात. ) ही बघ ही तुझी बायको ! आणि ही तुझी मुलगी !

**घोडके :** ( नीराच्या अंगावर त्वेषानें धांवतो. ) आयत्या वेळीं माझ्या सुखाचा नाश करायला तूं आलीस होय ?

**काका :** ( घोडक्याला एकदम पकडून पाठीमागें फेंकतात. ) बदमाष ! तूं समजलास काय मला ? दहा वर्षे मी फौजदार होतों चोराच्या आळंदीला !

**मावशी :** ( पश्चात्तापानें ) ही याची पहिली बायको ! अन् हिला टाकून देऊन का हा हिच्याशीं लग्न करायला निघाला ? ( प्रभातला कुरवाळीत ) अरे मेल्या घोडक्या—

**काका :** चंडोल, थांबलास काय ! जा बोलावून आण पोलिसाला.

**घोडके :** पोलीस मला काय करणार ? हिंदु कायद्याप्रमाणें नवऱ्याला एका वेळीं वाटेल तितक्या बायका करायची आपल्यामध्यें परवानगी आहे—